# लोभ नसावा,
# हे विनंति!

[HASTY HEART]


लेखक

**जॉन पॅट्रिक**

अनुवादक

**विजय तेंडुलकर**



ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबअी ४

**मूल्य दीड रुपया**

# अंक पहिला

*आग्नेय आशियांत कुठें तरी, एक तात्पुरत्या स्वरूपाचें ब्रिटिश जनरल हॉस्पिटल. त्यातला बऱ्या होत आलेल्या रुग्णाचा विभाग. एका झांवळांच्या खोपटात तो वसला आहे.*

*या विभागाला एकूण तीन दरवाजे. एक बाहेर जाण्याचा. दुसरा मध्यभागी असलेला नर्सच्या कचेरींत जाण्याचा. तिसरा बहिर्विधीसाठीं जाण्याचा.*

*नर्सच्या कचेरींत जाण्याचा दरवाजा उघडला कीं भिंतीला एक सूचनाफलक आणि त्याला अडकवलेले बरेच 'रिपोर्ट्स्' आणि 'ऑर्डर्स' चे कागद दिसतात. बाहेर जाण्याच्या दरवाजावाटे झाडीचा कांहीं भाग दिसतो. बहिर्विधीसाठीं जाण्याचा दरवाजा उघडला तर एका शेडचा काही भाग दिसतो.*

*या विभागाला एकुण खिडक्या तीन. त्यांतल्या दोन समोरच्या नर्सच्या कचेरीच्या बुटक्या दरवाजाच्या दोन बाजूंना आहेत. तिसरी बहिर्विधीसाठीं किंवा वॉशरूमकडे जाण्याच्या दरवाजाजवळ. पलिकडल्या शेडच्या सारवलेल्या भिंतीचा कांही भाग हिच्यावाटें दिसतो. भिंतीवर सोडलेल्या एका वेलाचाही कांहीं भाग या खिडकीवाटें दिसतो. या तीनहि खिडक्याना बाहेरल्या बाजूला बांबूची मोठी झडपें आहेत. प्रत्येक झडपाला कळकाचा एक तुकडा जोडलेला असून तो आंतल्या बाजूला आणलेला आहे. यानें झडप लावतां–उघडतां येतें.*

*भिंती आडव्या–उभ्या बांबूंना झावळाचे झांप जोडून बनवल्यासारख्या दिसतात.*

*या विभागात खालच्या कॉट्सूच्या डोक्याच्या भागांवर उंचवर एक बाबू आडवा बाधला असून त्याला त्या त्या कॉटवर एकेक मच्छरदाणी लटकवलेली आहे.*

*एकंदर सहा कॉट्स् आहेत. त्यांची डोक्याकडली बाजू समोरच्या भिंतीला टेकलेली. यांतल्या तीन कॉट्स् नर्सच्या कचेरीच्या दरवाजाच्या एका बाजूला आणि तीन दुसऱ्या बाजूला. पहिल्या तीनपैकीं प्रत्येक कॉटच्या उजव्या बाजूला एकेक फडताळवजा बुटकें टेबल आहे. दुसऱ्या तिहींच्या डाव्या बाजूला असेंच एकेक फडताळवजा टेबल आहे.*

*बहिर्विधीसाठीं जाण्याच्या दरवाजाशीं असलेल्या खिडकीखालीं एक अगदीं साधें दोन दारांचें लाकडी कपाट आहे.*

*याच बाजूला भिंतीशीं तीन घड्या होऊं शकणारे दोन 'स्क्रीन्स' आहेत. हे आडोशासाठीं वापरण्यांत येतात.*

*एक कळकाची काठी कोपऱ्यांत टेकून ठेवलेली आहे.*

*कॉट्स्वर पेशंट्स्साठीं गाद्या, अभ्रे, उशा आणि ब्लँकेट्स आहेत.*

*पेशंट्स् इस्पितळाचे पांढरे कपडे नेसले आहेत. नंतर अप-पेशंटस्च्या अंगावर निळे कपडेहि दिसतात.*

*मधोमध वर आडव्या बांबूला एक तेवता कंदील लटकलेला आहे. हा खालीं-वर करण्याची दोरी नर्सच्या कचेरीच्या दाराशीं अडकवलेली. शिवाय प्रत्येक कॉटशीं फडताळावर एकेक कंदील. तो मालवलेला.*

*पडदा वर जातो तेव्हां इस्पितळाच्या या विभागांत अंधार आहे. बंद खिडक्या-दारावाटे येतो आहे तेवढाच प्रकाश. मधोमधचा कंदील तेवतो आहे. पांच कॉट्सवर पेशंट्स असून त्यांच्याभोंवतीं मच्छरदाण्या असल्यानें ते दिसत नाहीत. रिकामी कॉट अत्यंत नीट-नेटक्या अवस्थेंत असून तिची मच्छरदाणी वर जुडी होऊन लोंबत आहे. आतां डावीकडून उजवीकडे कॉट्सचे मालक पहा : (१) डिगर, (२) टॉमी, (३) यांक, (४) (रिकामी), (५) किवि, (६) ब्लॉसम.*

*ऑर्डर्ली हातांत बॅटरी घेऊन बाहेरून आंत शिरतो. आंत येऊन दरवाजा पुन्हा लावून घेतो.*

**ऑर्डर्ली :** उठा ! उठा ! जागे व्हा ! उठा ! *(प्रत्येक कॉटवर बॅटरीचा झोत टाकीत जातो. मग टोंकाची खिडकी उघडतो. झगझगीत सूर्यप्रकाश आत येतो.)* उठा म्हटलं ना ! *(दुसरी खिडकी उघडतो. मग ब्लॉसम आणि किवि*

*यांच्या कॉट्सच्या पायथ्याशीं येऊन मच्छरदाण्या उस्कटतो. 'आय हॅव गॉट सिक्स पेन्स' असलं कांहींतरी गाणं गुणगुणत रिकामी कॉट ओलांडून कंदिला-पाशीं जातो; तो खालीं करून फुंकून विझवतो आणि पुन्हा वर करून ठेवतो. मग यांकच्या कॉटशी जातो. कॉट गदगदा-हालवीत)* अरे उठा ! जागे व्हा ! *(कॉट पुन्हा हलवीत)* यांक! अहो सकाळ झाली सकाळ ! *(यांकची बिछान्यां-तल्या बिछान्यांत कांहीं हालचाल. पुन्हा सारं कांहीं थंड. ऑर्डर्ली त्याच्या बाजूची अरव्वी मच्छरदाणी कॉटपासून सोडवून घेऊन)* चला चला—जल्दी करा! उठा आधीं! *(यांकचं झिपरं मुंडकं मच्छरदाणीबाहेर निघतं. मग पंजा बाहेर येऊन मानगूट चोळतो. तिशीच्या वयाचा हा याक. धष्टपुष्ट. आळशी नव्हे, पण ऐसपैस. वाणीत थोडा तोतरेपणा. हा आतां उठून बसतो.)*

**यांक** : काय रे ! मरत का नाहींस एकदांचा ?

**ऑर्डर्ली** : चला—तोंडबींड धुऊन सामान आवरा आधीं ! सगळ्या पेशंटांन इथून हलवण्यांत येतंय् !

**यांक** : हलवण्यांत येतंय! विनोद करतोय् लेकाचा! *(पायांत स्लिपर्स सरक वतो आणि सुस्तपणें मच्छरदाणीची जुडी करूं लागतो.)*

**ऑर्डर्ली** : उठलांत कीं नाहीं तुम्ही ताबडतोब ! मग झालं तर ! *(टॉमी आणि डिगरच्या कॉट्सच्या मच्छरदाण्या उस्कटतो. तिसरी खिडकी सताड उघडतो.)*

**यांक** : उद्यां दुसरी कांहींतरी युक्ति शोध गड्या ! हलवण्यात येतय म्हणे हलवण्यांत येतंय ! हा हा ! *(जांभई)* हा ऑय...

**ऑर्डर्ली** : *(डिगर आणि टॉमीच्या कॉट्स गदगदवीत)* चला—चला—उठ मंडळीं—हॉस्पिटलला आग लागली—पावसाळा सुरू झाला—विमानहल्ल आला—धरणीकंप झाला—उठा ! *(टॉमी कूस बदलतो. ऑर्डर्ली वॉशरूमकडे जात)* अरे उठा बाबांनो ! चांगला अर्धा घंटा उशीर झालाय मला !

*(डिगर बसता होतो. मच्छरदाणीमधून हळूच बाहेर टोकरी काढतो. डोळे मिच मिचवीत याककडे पाहतो. डिगर हा पस्तिशीच्या वयाचा ऑस्ट्रेलियन चटपटेपणामुळें जरा तरुण दिसतो. वय झाल्यावरहि तरुण रहाणारी ही जात अंगानें पिळदार. मूळचं चाफेकळी नाक बऱ्या आकारांत आतां उरलेलं नाही कारण हा रेजिमेंटचा मुष्टि-युद्ध वीर आहे.)*

**डिगर :** कुणी तरी गालाला ओठांचा मृदु स्पर्श करून हळूच म्हणावं, "उठायचं आतां—"

**यांक :** नाहीं तर गरमागरम कॉफीचा कप समोर ठेवावा.

**डिगर :** छ्या! झोंप येते! कधीं उठावं तरी आपली झोंप येतेच आहे! *(जांभई दाबतो. डिगरला उठण्याची, फिरण्याची डॉक्टरांची परवानगी नाहीं. म्हणून यांक त्याची मच्छरदाणी गुंडाळतो.)*

**यांक :** *(तिकडे जात)* मला तर सकाळचं रातआंधळ्यागत होतं. दिसतच नाहीं कांहीं. घरीं मी उठतो तो प्रथम कसाबसा बाथरूममध्यें शिरतों. मग सिगरेटचं थोटुक बालडींत टाकतों आणि पायमोजे खिडकीबाहेर भिरकावतों! असे किती पायमोजे गेले असतील बाहेर! *(टॉमीच्या कॉटकडे पाहून)* टॉमीच घोरत होता वाटतं पुन्हा?

**डिगर :** घशाचं दुखणं आहे त्याचं. ॲडनॉइड्स.

**यांक :** हिप्पोपोटॅमस ऊर्फ पाणघोड्यांच्या जातींत नर मादीला साद घालतो तेव्हां त्याचा आवाज कांहींसा असाच होतो. *(ऑर्डर्ली ऊन पाण्याचीं दोन तस्तं घेऊन येतो वॉशरूममधून. डिगरच्या डावीकडच्या फडताळवजा स्टँडवर एक ठेवतो.)*

**ऑर्डर्ली :** सगळ्या अप-पेशंटांनीं वॉशरूममध्यें चला, चला लौकर. आटपा. आणखी दहा मिनिटांनीं मी कुणाचा लागता नाहीं. उन्हं चढण्याच्या आत झोप काढायची आहे मला. *(दुसरं तस्त टॉमीनजीक ठेवायला जातो.)* यांक, किविना उठवा.

**यांक :** *(किविच्या कॉटकडे जात)* आर्मी हॉस्पिटलात बरं होण्यासारखा दुसरा मूर्खपणा नाहीं. ऊठ रे किवि. सकाळ होऊन गेली, राजा! चरावया पक्षी उडून प्रहर उलटत आला! *(मच्छरदाणी उस्कटून किविला बसता करतो. हा उंचापुरा न्यूझीलंडर. याचा डावा हात पलिस्तरांत घालून हवेंत टांगता ठेवण्याची व्यवस्था केली आहे.)*

**किवि :** *(मच्छरदाणी गुंडाळूं लागल्यावर)* त्या टॉमीच्या घोरण्याचा बंदोबस्त एकदां कुणी तरी केलाच पाहिजे! *(आपल्या लांब तंगड्या ताणून पांघरुणाच्या बोंवाळाखालून बाहेर काढतो.)*

**यांक :** किवि, घाबरूं नकोस; पण तुझ्याबरोबर बिछान्यांत कुणी आहे, गड्या!

**किवि** : साली ही कॉट तरी दिवसा दिवसाला लहान होते आहे, नाहीं तर मी तरी नव्यानें वाढतों आहे !

**यांक** : आर्मी लॉंड्रींत पाठव तंगड्या तुझ्या—काय वाटेल तें धुऊन आटवतात ते ! *(डिगर दांत घासतो आहे. ऑर्डर्ली पाण्याचं तिसरं तस्त घेऊन येतो. किविनजीकच्या फडताळवजा स्टँडवर ठेवतो. मग जाऊन ब्लॉसमची मच्छरदाणी पायथ्याकडल्या बाजूनें उपसतो.)*

**ऑर्डर्ली** : उठा, महाराज, अहो उठा ! नाहीं तर नंबरी सापच सोडतों बिछान्यांत ! सिस्टर येईल एवढ्यांत. तुम्ही सारे जागे झालेले दिसलां पाहिजेत तिला.

**यांक** : *(ब्लॉसमशी जाऊन)* बाळ ब्लॉसम, सकाळ झाली ! *(मच्छरदाणी उचलतो. खाली कॉटवर उरतो ब्लॉसम. हा भला आडदाड, काळाकभिन्न नीग्रो. झोप अर्धवट झाल्यासारखा मिचमिच पहातो आहे.)* हां, ऊठ लेका.

**ब्लॉसम** : *(हंसून स्वतःचा निर्देश करीत)* ब्लॉस्—सम !

**यांक** : कळलं ! तेंच तुझं नाव ! *(टॉमीच्या कॉटच्या बाजूने आतां जोरजोरानें घोरणं ऐकूं येऊं लागलं आहे. सगळे आरडाओरडा करतात. ब्लॉसम वॉशरूमकडे जातो. याकाशिवाय आणखी अप-पेशट हाच आहे.)*

**डिगर** : पुरे !
**यांक** : खामोष !
**किवि** : हाणा लेकाच्याला !

*(यांक स्वतःच्या कॉटच्या उजवीकडे होतो.)*

**किवि** : डिगर, त्याच्या अंगाखालची चादर ओढ !

**डिगर** : *(टॉमीच्या बिछान्याशीं ओळकंबून)* नाथ, उठा ! *(पलंग गदगदा हलवतो.)* अरे ऊठ, लठ्ठया !

*(घोरणं बंद. टॉमी मच्छरदाणी वर करून पाहूं लागतो. बुटका. खूपच जाडा. आखूड केस. गमत्या विदूषकाचा थाट.)*

**टॉमी** : *(झोंपाळू सुरांत)* कांहीं झालं का रे बाबांनो ?

**डिगर** : होय होय—तूं मेलास. जजमेंट डे आहे हा. सेंट पीटर ब्रिगेडिअर आहे इथला. पंख मिटून नीट अटेन्शनमध्यें उभा राहा !

**टॉमी** : कोणी तरी सारखं घोरत होतं बुवा इथं !

**यांक** : *(टॉमीची मच्छरदाणी आवरत)* होय का ! झोपेंत लेका एवढा गोंगाट करतोस, त्यानं जागा कसा होत नाहींस तुझा तूंच ?

**टॉमी** : *(तस्तांतल्या पाण्यानं तोंडबींड धूत)* बाप रे ! केवढं भयंकर स्वप्न पंडलं मला रात्रीं. स्वप्नांत मी काम करीत होतों. मरेस्तोंवर काम करीत होतों. जाग आल्यावर असा थकवा आलाय ! बोट हलवायचेसुद्धां कष्ट होतायत. *(बोट हलवतो आणि कष्टी चेहरा करतो. सगळ्यांकडे पाहून उंच बायकी आवाजांत खुदखुदून हंसतो. स्वतःच्या प्रत्येक वाक्याला हंसण्याची सवय.)*

**डिगर** : पहा लेकाच्याला. जाडीं माणसं फार पाहिलीं आपण, पण एवढा लठ्ठ्या जन्मांत पाहिला नाहीं. काय रे, तुला नाहीं का हें सगळं जड वाटत?

**टॉमी** : तयार आहे बॉडी, म्हटलं ! सध्यां जरा ढिली सोडली आहे, इतकंच.

**यांक** : जास्त ढिली सोडशील तर तुझा तूंच तुला अडखळून पडशील एकादे वेळीं !

**टॉमी** : माझ्या बायकोला फार आवडतं बाळसं माझं ! माझ्या एकेका औंसावर प्राणापलिकडे प्रेम करते ती. *(ब्लॉसम वॉशरूममधून येऊन कॉटवर बसतो. ऑर्डर्ली कांहीं भांडीं आणि गरम चहाची बादली घेऊन येतो.)*

**ऑर्डर्ली** : यांक, हीं भांडीं वांटा सगळ्यांना.

*(यांक तीं कथलाचीं भांडीं ऑर्डर्लीकडून घेऊन प्रत्येक कॉटच्या पायथ्याशीं एकेक ठेवतो. मग स्वतःचं भांडं घेऊन स्वतःच्या कॉटवर बसतो. ऑर्डर्ली ब्लॉसमकडे जातो.)*

**टॉमी** : हूं...चहा ! *(मुद्दाम ब्रिटिश पद्धतीचे उच्चार करीत)* ब्रिंग मा माइ् टी, वेटाह. डु यु हीह् मा ?

**डिगर** : आचरट आहे झालं !

**ऑर्डर्ली** : *(ब्लॉसमला)* काय पाहुणे, हें काय थंड हवेच्या ठिकाणचं 'विश्रांति-धाम' समजलांत कीं काय ? अप-पेशंट काम करतात इथं ! हं, *(ब्लॉसमच्या कॉटशीं चहाची बालडी ठेवून त्याला सर्वांना चहा द्यायला खुणावतो.)* हं, चला—चला. जरा घाई करा. *(जातो. ब्लॉसम उठून एकेकाला चहा देऊं लागतो.)*

**डिगर** : परमेश्वरा, आज तरी खायला पुन्हा सॉय-लिंक सॉसेज पाठवूं नकोस.

**किवि** : पैज मारतोस? आज सॉय लिंक सॉसेजच मिळणार आपल्याला.

**ब्लॉसम** : *(किविच्या भांड्यांत चहा ओतीत)* ब्लॉस्—सम. *(टॉमीकडे जातो.)*

**टॉमी** : तरतरीत आहे बरं का मुलगा! पहा कसा भराभर शिकतो आहे एकेक गोष्टी. हा एवढा एक शब्द शिकायला फक्त आठवडा लागला याला! *(ब्लॉसम टॉमीला चहा देतो.)*

**डिगर** : आहे बुवा! हुशार आहे! अरे यांक, याला एकदम दोन शब्द कां शिकवीत नाहींस? ऑफिसर होऊन जाईल! *(ब्लॉसम डिगरला चहा देतो.)* थँक या, ब्लॉसम—या ब्लडी कॅनिबाल! *(ब्लॉसम यांककडे.)*

**किवि** : या बासुटोंची गोष्ट आहे कीं नाहीं माहीत तुम्हांला? फार चांगले लढवय्ये असतात हे. आफ्रिकेंत मी होतों त्यांच्या एका कंपनीबरोबर. वर्षवर्षभर लेकाचे पगारांतली दिडकीहि उचलीत नाहींत!

**यांक** : *(ब्लॉसम चहा ओतीत असतां)* कां? लाजतात?

**किवि** : लाजतात कसले—सांठूं देतात पगार. लढाई संपली कीं बासुटो लँडला जातील आणि जवळच्या पैशानें एक बाईल आणि बैलाचा कळप खरेदी करतील.

**टॉमी** : मला वाटतं—एक बैल आणि बायलींचा कळप हें जास्त बरोबर. *(स्वतःच्या या विनोदाला खिदळून हंसतो.)*

**डिगर** : *(किंचित् हंसत)* मूर्खच आहे लेकाचा!

**टॉमी** : पहा—माझ्या विनोदबुद्धीचा मत्सर वाटतो याला. *(ब्लॉसम स्वतःचा चहा ओतून घेतो, मग बालडी खालीं आपटून आपली मच्छरदाणी गोळा करतो. काहीं कथलाच्या थाळ्या घेऊन ऑर्डर्ली येतो. डिगर, टॉमी, यांक किवि आणि ब्लॉसमला एकेक देतो.)*

**डिगर** : *(ऑर्डर्लीला)* हा चहा माणसाच्या मटण-सूपसारखा लागतो.

**ऑर्डर्ली** : मग मला काय सांगतां? सिस्टरकडे करा तक्रार. *(यांककडे जातो.)*

**यांक** : मी आमच्या कॉंग्रेसमनलाच कळवतों—मला वाटतं, मॅबेल असावं तिचं नांव. *(ऑर्डर्ली किवि आणि ब्लॉसमकडे जातो.)*

**डिगर :** *(थाळींत पाहून)* अन्नाच्या नांवानं पुन्हा कालचाच पदार्थ. सॉय लिंक सॉसेज. सोयाबीनची असली नसली चवसुद्धां घालवण्याची खटपट असते यांची. *(ऑर्डर्ली बालडी आणि थाळ्याचा ट्रे घेऊन निघून जातो. टॉमी भुर्रुक् भुर्रुक् करून चहाचे घुटके घेतो आहे.)*

**यांक :** खातांपितांसुद्धां घोरतोय बघा! *(मग किविकडे दृष्टिक्षेप. एका हातानं खातांना याला अडचण पडते आहे.)* मदत हवी रे किवि?

**किवि :** *(मान हलवीत)* नको. पुढल्या आठवड्यांत या चिलखतांतून हात काढणार म्हणालाय मेडिकल ऑफिसर.

**डिगर :** म्हणजे निदान वर्षाची निश्चिन्ती.

**टॉमी :** मी म्हणतों दोन वर्षांची. आला तेव्हा भलतीच वाईट हालत होती या किविची. फार गोळ्या खाल्ल्या होत्या यानं.

**किवि :** काय आहे कीं, माणूस तसा सहजासहजीं मरतच नाहीं. जनावराला गोळी मारा—तें पट्दिशीं मरत. माणसाला गोळी मारा—त्याचा एकादा भाग जरी धड राहिला तरी तो जगतो. बरा होतो. माणसाला मारायचं काम सोपं नव्हे.

**टॉमी :** बरोबर. फार रक्त वहातं तेव्हांच मरतो तो.

**डिगर :** तूं बोलूं नकोस, लेका. तुला काय माहीत? वाळवंटांतल्या भुरट्या माशीच्या चाव्यानं जखमी होऊन इथं पोंचलास तूं!

**टॉमी :** कृपया कुणी याला माझं शौर्य वर्णन करील, कीं मलाच तें माझ्या तोंडानं सांगितलं पाहिजे?

**किवि :** जखमी झालास तेव्हां कुठं होतास रे तूं, टॉमी?

**टॉमी :** मी? झोंपेत होतों. *(हंसून हंसून घेतो.)*

**डिगर :** केवढा मोठा वीर हा!

**टॉमी :** असा डाराडूर झोपलों होतों आणि शार्पनेलचा गरमागरम तुकडा घुसला माझ्या मऊ मुलायम कातडींत!

**यांक :** पण कुठं?

**टॉमी :** मंडळी, पालथा झोंपलों होतों मी.

**डिगर :** तुकड्याचा शोध घेण्यासाठीं मेडिकल ऑफिसरला चांगला कोपरापर्यंत हात सरकवावा लागला असेल!

**टॉमी :** बायकोला कळवलं कीं निकराच्या धुमश्चक्रींत सैन्याचं नेतृत्व करतांना रणांगणावर जखम झाली मला!

**यांक :** *(उठतो. आपली थाळी आणि चहाचं भांडं ब्लॉसमच्या कॉटवर ठेवतो. जातांना वार्डेतली रिकामी कॉट दाखवून)* इथं आता कोण येतं, कोण जाणे!

**किवि :** बहुधा एकादा कॅनेडियन येईल. आसपासच्या टापूंत रॉयल कॅनेडियन एअर फोर्सचे लोक आले आहेत सध्या, असं सिस्टर म्हणत होती.

**डिगर :** अद्याप एखादा यॉर्कशायरमनहि आलेला नाहीं आपल्यांत.

**किवि :** या बाबतींत कुणाला पैज मारायची असेल तर मी तयार आहे! या वेळीं आयरिशमन येणार. आहे बेट्?

**टॉमी :** बरेच दिवस झाले, कुणी स्कॉट या बाजूला फिरकला नाहीं.

**यांक :** देव करो न् याहि वेळीं न येवो!

**डिगर :** का? स्कॉटस्शीं जमत नाहीं वाटतं तुझं?

**यांक :** नाहीं. आणि कुणाचं जमल्याचं ऐकिवांत नाहीं. अर्थात् स्कॉटचं स्कॉटशीं जमतं हा भाग वेगळा!

**किवि :** सिस्टर स्कॉट आहे.

**यांक :** हॅट. मुळींच नाहीं.

**डिगर :** ती कुणीहि असो, आहे मोठी चांगली. *(खाणं संपवतो. मग थाळी ठेवून सिगरेट पेटवतो.)*

**टॉमी :** चांगली? भलतीच छान बाई आहे ती. शिवाय सुंदर! *(हाहि खाणं संपवून सिगरेट पेटवतो.)*

**किवि :** ती स्कॉटलंडमध्यें रहात असे असं तीच मला म्हणाली होती. *(खाणं संपवून माझा मारण्याचं 'स्वॅटर' उचलतो.)*

**यांक :** मला विचारा तुम्ही! शाळामास्तरीण होती तेव्हां तिला त्या भागात रहावं लागलं होतं. जेमतेम वर्षभर तिनं बच्चे स्कॉट्स शिकवून शहाणे करण्याचा प्रयत्न केला आणि नव्हंस ब्रेकडाउन झाला बिचारीचा.

**डिगर :** काय रे, स्कॉट्सनीं एवढं काय घोडं मारलं आहे तुझं?

**यांक :** म्हटलं, मी स्वतः स्कॉटिश आहे. घराणं मूळ स्कॉटलंडमधलं आमचं.

**टॉमी :** म्हणजे स्वतःलाच पाण्यांत पहातो, लेकाचा ! *(सिगरेट पेटवतो.)*

**यांक :** एकूणएक स्कॉट्सना मी पाण्यांत पहातों. माझ्या आजोबांना पहायला हवं होतं तुम्ही. त्यांच्या मतें या जगांत दोनच काय ते शहाणे, कधींहि न चुकणारे महाभाग होऊन गेले. एक ते स्वतः आणि दुसरा प्रत्यक्ष परमेश्वर. क्वचित् परमेश्वर चुकला माकला असेल—पण आजोबा ? नांव नको !

*(ब्लॉसम उठून चहाचीं भांडीं आणि थाळ्या गोळा करतो.)*

**किवि :** त्यांच्याबरोबर रहात होतास कीं काय तूं ?

**यांक :** हो तर. आईवडील वारले तेव्हां माझं पालकत्व आजोबांनीं आपल्या बळकट हातीं घेतलं.

**टॉमी :** भलता कडक म्हातारा असणार.

**यांक :** डोकं भडकूं लागलं कीं दर वेळीं मला मोठमोठ्यानं काय म्हणायला लावीत, आहे माहीत ?

**किवि :** मी सांगतों—पाढे. मल्टिप्लिकेशन टेबल्स. *(माशी मारतो.)*

**यांक :** बायबलचे खंड पाठ म्हणावे लागत मला. अद्याप पाठ येतात मला ते. जेनेसिस, एक्सोडस, लेव्हिटिकस, नम्बर्स, ड्युटरॉनॉमी, जोशुआ, जजेस, रूथ, सॅम्युअल, किंग्ज, क्रॉनिकल्स, एझरा, नेहेमियाह, एस्थर, जॉब, साम्स, प्रॉव्हर्ब्स—*(हें सर्व म्हणत 'गॉड डॅम इट !' म्हणून वॉशरूमकडे जाणाऱ्या दरवाजाशीं जातो. ब्लॉसम भटारखान्याकडे निघून गेलेला.)*

**टॉमी :** तुझा आजोबा मोठा भयंकर असला पाहिजे.

**यांक :** त्यांच्याशीं हुज्जत सुरू केली तर काय करत असत ते, आहे माहीत ?

**डिगर :** पाठीची चामडी लोंबवीत ?

**यांक :** हॅट. त्यांचा ठेवणींतला बॅगपाइप होता. कोंबडा. तो काढून तो जोरजोरानं वाजवूं लागत. बॅगपाइप या वाद्याचा द्वेष मला वाटूं लागला तो तेव्हांपासून. बॅगपाइप वाजवतांना स्कॉट्स चालूं लागतात तें अगदीं बरोबर. त्याच्या आवाजापासून ते लांब जाऊं पहात असतात. *(वॉशरूममध्यें अदृश्य. ब्लॉसम भटारखान्यांतून येतो. बाहेर जाण्याचं दार उघडं धरून अटेन्शनमध्यें उभा रहातो. सिस्टर मार्गरेट येते. एकविशीची ही तरुणी. डोळे काळेभोर, अतिशय बोलके.*

*प्रत्येक गोष्टींतल्या गंमतीचा आस्वाद घेणारे. पेशंटस्‌बरोबर मोकळेपणानें, आत्मविश्वासानें वागण्याची पद्धत.)*

**मार्गरेट** : *(आपल्या कचेरींत जात)* थॅंक यू, ब्लॉसम. *(इतरांना)* गुड मॉर्निंग; गुड मॉर्निंग, गुड मॉर्निंग.

**सारे** : गुड मॉर्निंग, सिस्टर.

**मार्गरेट** : कसे काय आहात आज सगळे ?

**डिगर** : उत्तम—विझार्ड.

**टॉमी** : भक्कम.

**किवि** : टॉप—ओ.

*(मार्गरेट कचेरींत येते.)*

**यांक** : *(वॉशरूममधून किंचित् बाहेर येऊन टूथ-ब्रश हलवीत)* माझं स्कॉटिश रक्त मला काढून टाकतां येतं तर तें सारं मीं रेड क्रॉसला दान करून टाकलं असतं.

**किवि** : वेळींच खबरदारी घेतली नाहींस तर तुझा रक्तदाब मात्र आतां वाढणार आहे! *(मार्गरेट येते. थर्मामीटर्स असलेला ट्रे, तक्के, घड्याळ इत्यादि साहित्य हातीं घेतलेलं.)*

**मार्गरेट** : स्कॉट्सबद्दल बोलणं चाललेलं दिसतं तुमचं. काय म्हणणं आहे कुणाचं ?

**टॉमी** : या यांकला स्कॉट्स आवडत नाहींत.

**मार्गरेट** : त्यांची खरी माहिती नसेल त्यांना. स्कॉट माणूस बनवून झाल्यावर देवानं सांचा फोडून टाकला असं म्हणतात.

**यांक** : नक्कीच. आणि फोडला तोहि स्कॉट माणसाच्या डोक्यांतच ! *(वॉशरूम-मध्यें अदृश्य. रिकाम्या कॉटनजीक ट्रे ठेवून मार्गरेट यांकचं अंथरूण उस्कटं लागते. टॉमीकडे उशी टाकते, तो तत्परतेनें तिचा अभ्रा काढतो. ब्लॉसम त्याच्या कॉटच्या पायथ्याशीं येऊन 'अटेन्शन' मध्यें उभा रहातो.)*

**डिगर** : सिस्टर,—तुम्ही आलांत ना, कीं सकाळ रम्य वाटते.

**टॉमी** : तेंच बोलणं चाललं होतं आमचं, सिस्टर. तुम्ही आमच्या आवडत्या सिस्टर आहांत.

**मार्गरेट** : *(कॉटवरचा अभ्रा ओढून खालीं टाकीत)* तुमच्याबद्दल मला असं

कांहीं तरी म्हणतां यायला हवं होतं. पण मला म्हणतां येतं तें इतकंच कीं तुमच्या इतके अव्यवस्थित आणि बेशिस्त पेशंटस् आयुष्यात दुसरे भेटले नाहींत.

**डिगर** : सिस्टर, हें ऐकतांना यातना होतात जिवाला.

**किवि** : खात्रीनं आमच्याबद्दल बोलत नसाव्यात तुम्ही, सिस्टर.

**मार्गरेट** : तुमच्याबद्दलच म्हटलं मीं, आणखी असंहि म्हणते कीं सगळे एकदांचे टळाल तो सुदिन !

**टॉमी** : तुम्ही बाकी आतां रजा घ्यायला हवी, सिस्टर. ती दुष्ट मेट्रनबाई भारी राबवते ती तुम्हांला.

**मार्गरेट** : *(ट्रे वगैरे घेऊन ब्लॉसमकडे जात)* त्या बिचारीचा यांत कांहीं संबंध नाही. तुम्ही त्रास देतां मला ! तरी बरं किंडरगार्टनमध्यें शिकवायचा अनुभव होता पूर्वीचा; नाहीं तर बिलकुल आवरतां आलं नसतं तुम्हाला. *(अटेन्शनमध्ये उभ्या ब्लॉसमला)* तोंड उघडा. *(यांक वॉशरूममधून येऊन आपल्या कॉटकडे जाऊं लागतो. ब्लॉसम तिच्याकडे प्रश्नार्थक पहातो आहे.)* तों–ड ! *(स्वतः तोंड उघडून दाखवते.)* हूं !

**यांक** : *(त्या बाजूनें जात)* तुमच्या टॉन्सिल्स भलत्याच सुंदर आहेत, सिस्टर

**मार्गरेट** : तुमच्या बिछान्याशीं जाऊन मुकाट्यानें उभे राहा पाहूं. आणि तुमचीं तीं अमेरिकन सोंगं पुरे करा ! *(ब्लॉसमच्या तोंडांत थर्मामीटर ठेवते त्याची नाडी पहाते.)*

**यांक** :- *(साबण वगैरे कॉटवर ठेवून कॉटच्या पायथ्याशी अटेन्शनमध्ये उभा रहातो.)* राइट, लेफ्टनंट. आमच्या अमेरिकेंत, सिस्टर ही नर्स नसते 'नन्'—जोगीण असते.

**मार्गरेट** : इंग्लंडमध्यें नर्स पोरं संभाळते. *(तक्त्यावर कांहीं नोंद करून किविकडे जाते.)* तुम्ही हो, कसं काय आहे आज तुमचं ? झोंप चांगली लागली का ?

**किवि** : अगदीं लहान पोरासारखी.

**मार्गरेट** : हात कसा आहे ?

**किवि** : ठीक आहे.

**मार्गरेट** : खांदा हलवा पाहूं. *(हळुवारपणें त्याचा खांदा हलवून पहाते.*

दुखतं का? *(त्याचं उत्तर नाहीं.)* दुखतं ना? तरी पण सुधारतो आहे आतां. *(त्याच्या तोंडांत थर्मामीटर ठेवते.)* तुमचं पांघरूण असं अस्ताव्यस्त कां? *(तें नीट करते.)* तुमच्या लांब तंगड्यांचाहि जरा बंदोबस्त करा कांहींतरी. *(त्याची नाडी पाहूं लागते.)* तुम्हा लोकांना लष्करांतली शिस्त शिकवली आहे, हें सांगून कुणाला खरं वाटणार नाहीं.

**टॉमी** : *(हांक.)* सिस्टर!

**मार्गरेट** : चूप. मी आंकडे मोजतें आहे. *(मग किविचा हात सोडून टॉमी-कडे एक कटाक्ष टाकते. नंतर तक्ता भरते.)* काय झाल? काय हवं आहे तुम्हाला?

**टॉमी** : मला आराम वाटत नाहीं, सिस्टर.

**मार्गरेट** : ब्रिटिश मिलिटरी हॉस्पिटल आहे हें—इथं आराम करायचा नसतोच.

**टॉमी** : पण मी मृत्युशय्येवर आहें! मृत्युशय्येवरच्या बिचाऱ्या माणसांसाठींच हे तुमचे वॉर्ड चालतात ना?

**मार्गरेट** : नाहींत. *(किविच्या तोंडांतला थर्मामीटर काढून पहाते. तक्ता भरते.)* कर्नल्सना तपासणी करण्याकरतां चालतात. झालं? आतां गप्प बसा. *(यांककडे जाते. त्याच्या तोंडांत थर्मामिटर खुपसते.)*

**डिगर** : हें असलं बोलणं आपल्या कर्नल त्या काववेञ्जनं ऐकलं तर काय म्हणेल तो म्हातारा?

**मार्गरेट** : *(नाडी पहात)* डिगर, आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांविषयीं जरा अधिक आदर दाखवत चला यापुढें. काववेञ्जबद्दल...कर्नलबद्दल काववेञ्ज असा उल्लेख होतां कामा नये. *(यांकच्या नाडीची नोंद तक्त्यावर करते. थर्मामीटर त्याच्या तोंडांतच.)* धुतलेले कपडे कुणाकुणाला हवेत? आहेत ते फार मळले नसतील तर आणखी एक दिवस तेच चालवा. आत्तां माझ्याकडे पुरेसे नाहींत.

**किवि** : माझ्या कपड्यांवर मी चहा सांडला, सिस्टर.

**डिगर** : अरे सांगूं नकोस—तो चहा परत मिळवण्यासाठीं कपडे उकडील ती!

**मार्गरेट** : एकजात सारे वात्रट आणि वाह्यात आहांत तुम्ही. *(यांकच्या तोंडांतला थर्मामीटर काढते. तक्त्यावर नोंद करते.)* यांक, झोंप कशी लागली?

**यांक** : एकसारखीं तुमचींच स्वप्नं पडत होतीं.

**मार्गरेट** : कांहीं तरीच. तुमच्या नाडीचे ठोके जलद् पडताहेत आज.

**यांक** : मनगट दाबतां तुम्ही माझं; मग नाडीचे ठोके वाढतात.

**मार्गरेट** : तब्बेत बरी आहे आतां तुमची. पण एम. ओ. नं प्लास्माक्विन चालू करायला सांगितलंय तुम्हांला. तुमच्या अंगांतला सारा मलेरिया गेला पाहिजे असं तो म्हणतो. *(डिगरकडे जात)* आणि तेवढे माझ्या कपाटांतले कपडे काढून कुणाकुणाला हवे त्याला वांटाल का? मला वाटतं तीन तरी जोड्या असतील.

**यांक** : हो. *(कपाटाकडे जातो. उघडून कपडे काढतो.)*

**मार्गरेट** : *(डिगरसमोर थर्मामीटर धरून)* तुम्हांला हवी कपड्यांची धुतलेली जोडी?

**डिगर** : आहे ही बरी आहे. अजून पांढरी दिसते. मला चालेल हीच.

**मार्गरेट** : *(त्याच्या तोंडांत थर्मामीटर ठेवून त्याची नाडी पहात)* रात्रीं झोंप बरी लागली! *(तो होकारार्थी मान हलवतो. तिच्या हातावर गाल टेकतो.)*

**यांक** : *(कपडे घेऊन)* कुणाला हवेत कपडे?

**किवि** : मला.

**यांक** : घे. तुझ्या अंगावर हे धाकट्या भावाचे वाटतात. *(त्याच्याकडे एक जोडी फेकतो.)*

**टॉमी** : मला हवेत.

**यांक** : कपडे कमी असतात त्यांत काय आश्चर्य? तूं सगळे फाडतोस! *(त्याच्याकडे एक जोडी फेकतो. तिसरी जोडी पुन्हां कपाटांत नेऊन ठेवतो. किवि आणि टॉमी आपापली जोडी आपल्या फडताळाच्या खणांत ठेवतात.)*

**मार्गरेट** : *(डिगरकडून थर्मामीटर घेऊन)* पाठ कशी आहे हो आज तुमची! *(थर्मामीटर पाहून. तक्त्यावर नोंद करते.)*

**डिगर** : जरा चोळली तर फार बरं वाटेल.

**टॉमी** : माझी चोळतां तुम्ही ना, म्हणून त्याचीहि चोळून हवी आहे त्याला! प्रत्येक बाबतींत माझा मत्सर, दुसरं काय?

**मार्गरेट** : *(टॉमीकडे जात)* हें एवढं काम आटोपलं कीं तुम्हां दोघांच्याही

 लोभ नसावा, हे विनंति!

पाठी चोळतें बरं का मी. *(टॉमीला)* तुम्ही—आज जरा ओढलेला दिसतोय तुमचा चेहरा. रात्रीं ढुंगण दुखत होतं ?

**टॉमी** : भयंकर. डोळ्याला डोळा नव्हता, सिस्टर.

**यांक** : कुणाच्याच.

**टॉमी** : स्वप्नं पडत. भयकर स्वप्नं पडत. उदाहरणार्थ, : मी एकसारखा कष्ट करतो आहे—आणि बाजूला एका कुपणावर आरामात बसून माझी बायको खूळ लागल्यासारखी हंसते आहे. *(स्वतः खिदळतो. मार्गरेट त्याच्या तोंडांत थर्मामीटर सरकवते. हंसणं बंद.)*

**मार्गरेट** : तुमचं मन खातं तुम्हाला. *(नाडी पहाते.)* लष्करांत दाखल होण्या-आधीं कामचुकारपणा किती करीत होतां तुम्ही ?

**टॉमी** : *(थर्मामीटर हातांत काढून घेऊन)* वेटर होतो मी. म्हणजे सासऱ्याचं 'पब' होतं माझ्या—तो जातो कधी त्याची वाट पहात असें मी. वाट पहाणं : टु वेट—म्हणून—

**मार्गरेट** : थर्मामीटर तोडांत ठेवा पाहूं. *(तो ठेवतो.)* जरा बरे झालात कीं इथं कामाला लावलं पाहिजे तुम्हाला.

**डिगर** : लग्न झालंय म्हणे याचं ! काय अजब गोष्टी घडताहेत या जगांत एकेक !

**किवि** : काय रे, काहीं मूलबाळ ?

**टॉमी** : *(थर्मामीटर तोंडांतून काढून मार्गरेटकडे सुपूर्द करून)* तीसुद्धां एक बिकट समस्याच होऊन बसली आहे. आमच्या घराण्यात वैशिष्ट्य असं कीं, वयाची साठी उलटली तरी पोरं होत रहातात. मला दोन वर्षे वयाची एक आत्या होती ! आणि चार वर्षांचा काका ! *(खिदळत)* आमच्या आत्याचा लंगोट बदलीत असें मी !

**मार्गरेट** : *(तक्त्यावर नोंद करून एकदम)* त्या बासुटोला विसरणार होते आतां मी ! *(ब्लॉसमकडे जाते. त्याच्या तोंडांत थर्मामीटर नाहीं हें पाहून चकित.)* हें काय ! गिळला कीं काय यानं थर्मामीटर ! *(सगळे उठून बसून पहातात. यांक बसता होऊन पुन्हा आडवा होतो. मार्गरेट ब्लॉसमपुढें जाऊन स्वतःच्या तोंडाकडे बोट करून थर्मामीटरबद्दल पृच्छा करते.)*

**ब्लॉसम :** *(अख्खा थर्मामीटर तोंडाबाहेर काढून मार्गरेटकडे देतो. विनय पूर्वक हंसत)*. ब्लॉस्—सम.

**मार्गरेट :** *(दटावीत)* पुन्हा असलं कांहीं करूं नका. थर्मामीटर्स महाग आहेत. *(थर्मामीटर घेऊन न्याहाळते, तक्त्यावर नोंद करते.)* कुणाला तरी या अडाण्याशीं बोलता येतं तर फार बरं झालं असतं. *(यांकच्या हातीं ट्रे देत)* यांक, हें सर्व जरा माझ्या ऑफिसांत ठेवा. ठेवाल का?

**यांक :** *(घेत)* हो. ठेवतों कीं. *(जातो घेऊन.)*

**मार्गरेट :** *(ब्लॉसमपाशींच)* आतां हा वॉर्ड युद्धआघाडीवरच्या एकाद्या खंदकापेक्षां उजवा दिसेल असं कांहीं करतां येतं का पाहूं या आपण, ब्लॉसम. *(कॉट्स सारख्या करायला खुणावते. तो त्या कामाला लागतो.)*

**डिगर :** वा, कॉट्स एका रांगेनें एका रेषेंत सारख्या करणं. पेशंटांना किती बरं वाटूं लागतं असल्या साध्या साध्या गोष्टींमुळें, कल्पना नसते कुणाला.

**मार्गरेट :** त्याहून असं केल्यानं कर्नलचं माथं थंड रहातं हें महत्त्वाचं.

**यांक :** *(नर्सच्या ऑफिसांतून घाईगर्दीने येऊन बोलण्याचा तोतरा प्रयत्न करीत)* का—का—का—का—का—

**मार्गरेट :** *(त्याच्याकडे जात)* काय झालं, यांक?

**यांक :** *(जवळच्या दाराची उघडझांप करून)* का—का—का—का—

**डिगर :** वाघ मागं लागलाय त्याच्या.

**यांक :** *(हातवारे करीत)* का—का—का—का—

**मार्गरेट :** सावकाशीनं सांगा हवं तर.

**यांक :** थ—थँक यू. *(दरवाजाकडे बोट दाखवून)* कावबेज्ज!

**मार्गरेट :** *(दाराकडें जात)* कांहींतरीच! इतक्या लौकर नाहींच यायचे ते इन्स्पेक्शनला.

**यांक :** पाहिलं. मीं पाहिलं. या डोळ्यांनीं. शप्पथ!

**मार्गरेट :** चूक झाली असेल तुमची. नजरचूक. *(दार उघडते, बाहेर पहाते आणि झटक्यानें दार बंद करून वळत)* आटपा—नीट ठेवा सारं जागच्या जागीं! आपापल्या वस्तू लपवा सगळ्यांनीं! *(टॉमीच्या कॉटवरची उशी उचलून*

*ती यांकच्या कॉटवर ठेवते. ब्लॉसम आपला बिछाना भराभर नीट करून कॉटचा पायथ्याशी अटेन्शनमध्यें उभा रहातो.)*

**यांक** : *(बिछाना नीट करीत)* तरी मी सांगत होतो—

**मार्गरेट** : *(मळके अभ्रे गोळा करीत)* भिंतीवर कुणाला कोळिष्टकं दिसताहेत? *(सर्वांचीच लगबग. सगळे मळके अभ्रे मार्गरेट टॉमीच्या ब्लँकेटांत सारून देते.)* हं—तुमच्याबरोबर जरा असू द्यात हो हे!

**टॉमी** : *(पोटावर झालेला ढीग पसरण्याचा प्रयत्न करीत)* त्याना वाटेल मला जलोदर झाला!

**डिगर** : *(भिंतीकडे बोट दाखवीत)* सिस्टर, तें पहा तिथं कोळिष्टक.

**मार्गरेट** : *(यांकचा बिछाना नीट करतांना थांबून)* ओढा तें खालीं. लौकर!—

**यांक** : *(बांबूची काठी घेऊन तें झाडतो.)* वास्तविक स्वतःची कांहीं किमत असलेला कोळी ब्रिटिश जनरल हॉस्पिटलांत आपला एकहि पाय ठेवायचा नाहीं.

**टॉमी** : कर्नलला काववेब्जची म्हणजे कोळिष्टकांची भारी चीड!

**मार्गरेट** : *(सगळीकडे नजर टाकीत)* हें ठीक दिसतं आतां. आपापल्या कॉटशीं उभे राहा सर्वांनीं—लौकर. *(ती स्वतः दाराशीं जाऊन अटेन्शनमध्यें उभी रहाते. उभे राहूं शकणारे कॉटच्या पायथ्याशीं अटेन्शनमध्यें उभे, उरलेले पडल्या पडल्या अॅटेन्शनमध्यें. कर्नल येतो. वॉर्ड आतां मोठा टापटिपीचा दिसतो आहे. कर्नल उंच आहे. थकल्यासारखा पोक्या आहे. तसा फारसा मातबर दिसत नाहीं. मधून मधून उगीचच नाक उचकतो. डोक्यावर बोडका. मानेला स्टेथास्कोप लटकत आहे. वॉर्डवर चौफेर नजर टाकतो.)* गुड मॉर्निंग, सर. *(मार्गरेट दार बंद करते.)*

**कर्नल** : गुड मॉर्निंग, सिस्टर. *(पेशंट्सकडे पहात)* चालूं द्या—बसा—बसून घ्या. *(सगळे बसतात.)*

**मार्गरेट** : *(कर्नलकडे जात)* इतक्या लौकर यालशी अपेक्षा नव्हती, सर.

**कर्नल** : *(वॉर्ड न्यहाळीत)* असं! वॉर्ड मोठा नेटका ठेवला आहे तुम्हीं.

**मार्गरेट** : थँक यू, सर.

**कर्नल** : तुमच्या पेशंट्सशीं जरा बोलावं म्हणून आलों मी. *(सर्वांकडे पहातो.*

*पुन्हा मार्गरेटला)* मला वाटतं, तसे स्वभावानं फार मनमिळाऊ आहेत सारेच

**मार्गरेट :** माझ्याशीं संबंध आलेल्यांत, माझ्या भाग्यानें हे पेशंटस् अत्यं व्यवस्थित, नम्र आणि एकदरीनं मजेदार आहेत, सर.

**कर्नल :** उत्तम. आतां—मला वाटतं मेट्रन सांगत होती मला, कीं तुमच इथं एकदोन कॉटस् रिकाम्या आहेत—

**मार्गरेट :** *(दाखवीत)* हो—आहे, सर. ही एक आहे.

**कर्नल :** हूं. आतां सकाळीं माझा एक पेशंट मी इकडे पाठवतों आहे.

**मार्गरेट :** ठीक आहे, सर. सर्जिकल का ?

**कर्नल :** हो. त्याबद्दलच सगळं एकदां सांगावं म्हणून जातीनं आलो मं या केसबाबत सार्‍या वॉर्डचं सहकार्य लागणार आहे मला. *(मधोमध जाउ सर्वांना)* जरा एक मिनिट लक्ष द्याल का मी काय म्हणतों इकडे ? *(बोलायच कचरत असल्यासारखा नाक पंजानं कुरवाळतो किंचित्काळ. मग)* तुम मदत मिळवावी म्हणून आलोंय मी.

**यांक :** *(कुणीच बोलत नाहीं म्हणून)* नक्की कशा प्रकारची मदत, सर ?

**कर्नल :** *(त्याच्याकडे रोखून पहात)* तुम्ही अमेरिकन आहात, नाही का ?

**यांक :** *(उभा राहून शिस्तीनें समोर पहात)* होय, सर—अमेरिकन फील सर्व्हिस—ॲम्ब्युलन्स ड्रायव्हर ॲटॅच्ड टु दि ब्रिटिश.

**कर्नल :** *(त्याच्या जवळ जात)* पाहिलं आहे मी तुम्हाला आधीं कुठं तरं

**यांक :** मागल्या खेपेला—हा वॉर्ड तपासतांना.

**कर्नल :** उंहूं. त्याही आधीं. कांहीं तरी अप्रिय प्रसंग असला पाहिजे तो.

**यांक :** मला वाटलं होतं सर, कीं तुम्ही विसरलां असाल तो. एक दिव माझ्यापायीं तुमच्या गाडीला अपघात होत होता. माझ्या हातची गाडी म घालून तुमच्या गाडीला जवळ जवळ रस्त्याबाहेर हुसकली मी.

**कर्नल :** अपघात होत होता नव्हे, झालाच होता. कसाबसा वांचलों.

**यांक :** *(स्मितपूर्वक)* तेंच, सर. वांचलांत.

**कर्नल :** हूं. बसा. *(यांक बसतो.)* यापासून कांहीं बोध घेऊन पुढल्या खेपेर अधिक शहाणे व्हाल म्हणून संधि देतों मी तुम्हांला.

**यांक :** थँक यू, सर.

**कर्नल** : *(इतरांना)* माझा एक पेशन्ट इथं तुमच्यांत आणून ठेवतों आहे मी. या माणसावर तांतडीची शस्त्रक्रिया केली होती मी. शार्पनेल काढला त्याच्या पोटातून. त्या प्रकरणांत त्याची एक किडनी काढून टाकावी लागली. तो आतां जवळ जवळ सुधारला आहे. त्याला मदत केली पाहिजे तुम्ही.

**यांक** : ती कशी तें विचारूं का, सर ?

**कर्नल** : त्याला आनंदांत, मजेंत ठेवलं पाहिजे तुम्ही. *(नाक बोटांनी एकदां ओढून)* त्याच्या रेजिमेंटमध्यें परत दाखल व्हायला हपापलाय तो. पण इथून त्याला डिस्चार्ज देतां येत नाहीं मला. तें अगदीं शक्य नाही. तो विचारहि अशक्य आहे.

**मार्गरेट** : शस्त्रक्रियेंतून हा पेशंट बराच सुधारलाय असंच म्हटलंत ना तुम्ही, सर ?

**कर्नल** : हो. थोड्याच दिवसांत तो पुरा सुधारेल—शस्त्रक्रियेंतून. परंतु त्याला आता उरली आहे एकच किडनी. वस्तुतः एका किडनीवर हयात निभेल एखाद्याची. परंतु असंहि आढळून आलंय कीं ही एकुलती एक किडनीहि सदोष आहे त्याची. दोन किडनीचं काम ती एकटी करील—पण मर्यादित कालपर्यंतच.

**यांक** : आणि मग, सर ?

**कर्नल** : मग—किडनी निकामी होईल—काम थांबेल तिचं—या माणसाला विषबाधा होऊं लागेल—युरेमिक पॉयजन म्हणतात या विषबाधेला. एकुलती एक किडनीहि बंद पडते तेव्हां हा परिणाम अपरिहार्य ठरतो. मग मरण.

**मार्गरेट** : पेशंटला याची कल्पना आहे, सर ?

**कर्नल** : नाहीं. त्याला कांहीं सांगायच नाहीं असं मी ठरवलं. त्याला घरचं कोणी नाहीं—कसले पाश नाहींत. आणि मरणाची आगाऊ कल्पना दिली तर तो खंत करीत राहील आणि त्यांत त्याचा कांहीं फायदा नाही. म्हणून तो चांगल्या स्थितींत आहे तोवरच मी त्याला इथं आणून ठेवतों आहे—कारण—मला वाटतं, मरणकाळीं माणसाजवळ त्याचीं कोणी ना कोणी माणसं असावींत.

**क्रिवि** : किती दिवस उरलेयत या माणसाचे, सर ?

**कर्नल** : फार फार तर—सहा आठवडे.

**टॉमी** : कांहीं इलाज नाहीं यावर, सर ?

**कर्नल :** थोडाफार आहे तो तुमच्या हातींच आहे. त्याला अखेरपर्यंत बरं वाटत राहील असं करणं.

**यांक :** आणि त्याला आपण सुधारलों आहों असंच वाटतंय, सर ?

**कर्नल :** हो. पण याहून वेगळं कांहीं त्याला आतां सांगणंहि क्रूरपणाचं ठरेल. त्याला बरं वाटावं म्हणून शक्य ते करा तुम्ही सारे.

**यांक :** होय, सर.

**डिगर :** आमची शिकस्त करूं आम्ही, सर.

**टॉमी :** आम्ही त्याला कांहीं सांगणार नाहीं, सर.

**किवि :** खूप करमणूक करूं आम्ही त्याची.

**मार्गरेट :** चांगले आहेत हे सारे—विसंबायला अगदीं हरकत नाहीं यांच्यावर, कर्नल.

**कर्नल :** थँक यू. एकेक प्रसंग मोठे विचित्र येतात हेंच खरं. अच्छा. चालूं द्या. *(जाऊं लागतो. मागून मार्गरेट)* सी सोल्ळामध्यें एकटाच आहे तो. तुमच्या ऑर्डर्लीला, त्याची तयारी होतांच त्याला इकडे आणून सोडायला सागून ठेवलंय मी. *(दार उघडून तिला)* त्याला ऊठ-बस करायला हरकत नाहीं. त्याच्या मर्जीचा भाग राहील तो.

**मार्गरेट :** त्याची चांगली काळजी घेऊं आम्ही, सर.

**कर्नल :** *(सर्वांना)* अच्छा. *(मार्गरेटला)* इन्स्पेक्शन नको आज. थँक यू, सिस्टर. *(वळून निघून जातो.)*

**मार्गरेट :** *(दार लावून वळते. मग कपाटाकडे जात)* चला, कामं आहेत अजून बरींच. यांक, मी टॉमी आणि डिगरकडे पहातें तोवर तुम्ही किविचं अंग पुसून घेतां का ?

**यांक :** *(उठतो, आडोशाचे पडदे ब्लॉसमच्या मदतीनें हलवून)* बायको फार चांगली झालों असतों मी. कामसू, तत्पर. *(मार्गरेट टॉमीकडे.)*

**किवि :** यांक, तुला आवडेल का रे आगाऊ कळलेलं—कीं आपण लौकरच मरणार आहोंत ?

**यांक :** मी मरणार तर आहेच—केव्हां तरी. आणि अचानक ती वेळ येऊन थक व्हायला मिळावं अशी इच्छा आहे आपली. *(किविच्या कॉटशी*

*पडदे सरकवत नेतो. आडोशांमागें अदृश्य. मार्गरेट टॉमीचं अंग चोळते आहे.)*

**डिगर** : मला समजत नाहीं, किडनीशिवाय कां जगतां येऊं नये माणसाला? *(टॉमीकडे पहात)* हा नाहीं का मेंदूशिवाय व्यवस्थित जगत?

**मार्गरेट** : *(टॉमीला)* पाठ करा जरा.

**टॉमी** : *(पाठ करतो. ब्लॉसम उभा राहून पहातो आहे त्याचं अंग चोळणं.)* हा आहे तरी कोण, सिस्टर?

**मार्गरेट** : कोण कोण आहे?

**टॉमी** : येतोय तो.

**मार्गरेट** : मला तरी काय कल्पना?

**टॉमी** : जगण्याचा बिलकुल सभव नाहीं?

**मार्गरेट** : कर्नलनीं सांगितलं तें ऐकलंत.

**टॉमी** : धक्का बसला ऐकून.

**मार्गरेट** : अशा गोष्टींचा नेहमींच धक्का बसत असतो.

**टॉमी** : काय सालं दैव आहे, सिस्टर! नुकती कुठे जरा पहेचान होणार आमची—सहा आठवड्यांत—आणि खलास! आटोपणार ग्रंथ! *(क्षणभर स्तब्ध. मग)* सिस्टर, तुम्हांला तरी या गोष्टींची केव्हां ना केव्हा सवंय होते का? तुम्ही असल्या पेशंटशीं अगदीं अलिप्तपणें, तुटकपणें वागत असाल, नाहीं?

**मार्गरेट** : काहीं तरी नका बोलूं लहान पोरासारखं.

**टॉमी** : अहो पण जखमी माणसं म्हणजे पोरंच कीं! मोठ्या बाप्याची पाठ थोडीच चोळाल तुम्ही अशी, सिस्टर?

**मार्गरेट** : *(पाठीवर चापटी मारून)* चावटपणा नको. *(टॉवेलनं त्याची पाठ पुसते.)*

**डिगर** : *(टॉमीची पाठ पाहून)* आयूला, काय चरबी आहे! अन्नासारखं अन्न खाऊन माणूस कसा लठ्ठ होतो एवढा?

**टॉमी** : ग्रंथीच तशा जबरदस्त हव्यात त्याला! हां! सैन्यांत भटाऱ्याचं काम करूं लागलों तेव्हांपासून माझ्या कार्डावर एक नोंद कायम आहे : ओबेस.

**डिगर** : काय म्हणालास, येडपटा?

**टॉमी** : ओबेस. कुणास ठाऊक, म्हणजे काय तें. *(खिदळतो.)*

**डिगर :** काय लेकाचा बथ्थड आहे ! सिस्टर, ओबेस म्हणजे काय ?

**मार्गरेट :** लठ्ठ.

**डिगर :** कळलं रे ? म्हणजे नुसतं लठ्ठ असून चालत नाहीं लेकाच्याला. ओबेस होतो, ओबेस ! कसला ओबेस न् काय, चक्क ढमाल्या आहे न् काय हा !

**टॉमी :** यापुढें कृपा करून माझा उल्लेख करतांना माझ्या रोगाचं विशिष्ट नांव उच्चारत चला. ओ–बे–स.

**मार्गरेट :** *(पाठींत सपाटा हाणीत)* बस्स ! आतां ते धुवायचे अश्रे टाक पांघरुणांबाहेर—म्हणजे जरा सुटसुटीत दिसाल. *(तो अश्रे बाहेर उडवतो. कर्नल आला त्याआधीं हे त्याच्या ब्लँकेटांत सारलेले. मार्गरेट डिगरकडे जाते.)* डिगर शर्ट वर करा.

**टॉमी :** *(डिगर तयार होत असतां)* मध्यंतरीं बायकोला एक फोटो पाठवला मी माझा. त्यावर तिचं पत्र आलं कीं हें पहा, याल तेव्हां आणखी जाड होऊन येणार असाल तर येऊंच नका ! म्हणजे घ्या ! संसारांत मी एवढं माझं रक्त आटवलं, घाम गाळला, दोन तृतीयांश पगार तर जातोच आहे परस्पर कापून, त्याचं हें फळ ! म्हणे येऊंच नका ! *(खिदळतो )*

**डिगर :** पुरे रे—आतां झोंप पुन्हा बरं. *(टॉमी आडवा होतो. ब्लॉसम मळके अश्रे घेऊन नर्सच्या ऑफिसांत निघून जातो.)*

**मार्गरेट :** *(डिगरचा कणा हळूच चोळून)* ठीक वाटतं ना ?

**डिगर :** उत्तम ! विझार्ड ! *(सुखाचा उसासा टाकतो. क्षणभरानें पुन्हा)* या माणसाशीं आतां आपण सगळ्यांनीं कसं वागायचं, सिस्टर ?

**मार्गरेटः :** नव्या पेशंटशीं ? माणसासारखं.

**डिगर :** मला जमतं तें, सिस्टर. मी खरा तर धर्मगुरूच व्हायचा. आईची तशीच इच्छा होती माझ्या.

**मार्गरेट :** मग मुष्टियुद्धाकडे कुठं वळलांत ?

**डिगर :** ईश्वराला माहीत. प्रभूचं चिंतन करीत पवित्र मद्य चाखण्यांत घालवायचा काळ आम्ही ठोसे खाण्यांत खर्च केला !

**मार्गरेट :** पॅराट्रूप्समध्यें आहांत ना तुम्ही ?

**डिगर :** हो.

 लोभ नसावा, हे विनंति

**मार्गरेट** : कितीदां विमानांतून उडी मारली आहे तुम्ही ?

**डिगर** : बारा वेळां.

**टॉमी** : *(बसत)* समजा, पॅराशूट उघडली नाहीं तर नवी देतात का तुम्हांला ? *(अनेक मजली हंसून अखेर आडवा लोळतो.)*

**डिगर** : जरा नवीन चुटके कां वाचीत नाहींस रे तूं ?

**मार्गरेट** : पॅराशूट खरं म्हणजे उघडतेच, नाहीं का ?

**डिगर** : हो. पण क्वचित् तिचं रेशमी कापड दमट होऊन चिकटून बसतं. अजूनपर्यंत माझं दैव जोरावर आहे—पण असं घडतांना बघितलंय मी अनेकवार —पॅराशूट उघडतच नाहीं.

*(मार्गरेट टॉवेल उचलते. ब्लॉसम येऊन डिगरचं अंग चोळणं पहात रहातो.)*

**मार्गरेट** : दुसरीकडे तुमची बदली कां करून घेत नाहीं तुम्ही ?

**डिगर** : इथं जादा पगार मिळतो आम्हांला. लग्न झालंय माझं.

**मार्गरेट** : *(डिगरची पाठ टॉवेलनं पुसत)* नको तेव्हां चिकटून बसणाऱ्या रेशमी कापडाची कल्पना तुमच्या बायकोला कशी वाटते ?

**डिगर** : ती म्हणते स्वतःला जपा. पण तसं तिनं एरवींहि म्हटलंच असतं.

**मार्गरेट** : *(टॉवेल बाजूला करत)* मग जपा स्वतःला. तुमचं काम खरंच मोठं धोक्याच असतं.

**डिगर** : आतां मला अनुभव मिळाला आहेच कीं. *(यांक आडोशाचे पडदे मिटून बाजूला सरकवून ठेवतो.)*

**मार्गरेट** : *(उभ्या ब्लॉसमकडे पहात)* या बासुटोचं काय करायचं तें एम्. ओ. एकदां ठरवून टाकतील तर बरं.

**टॉमी** : *(बसत)* काय हो सिस्टर, तो नुसता घरच्या आठवणीनच झुरतोय ?

**मार्गरेट** : नाहीं तर काय. आज दोन महिने झाले, ताप असतो याला सारखा. याला याच्या जमातींत परत पाठवलं नाहीं तर हा झुरून मरेलसुद्धां.

**ब्लॉसम** : *(आपल्याविषयीं बोलणं चालल आहे हें जाणून स्वतःचा निर्देश करीत)* ब्लॉस्–सम.

**मार्गरेट** : हें बघ ब्लॉसम, तुझ्या कॉटवर बैस जा. आणि तुझी माळ तयार कर. *(गळ्याशीं हात नेऊन दाखवते.)* तुझ्यासाठीं आणखी मणी मिळतात का

पहातें. *(जाते. ब्लॉसम तिची आज्ञा शिरोधार्य मानून तिनं सांगितल्याप्रमाणें करतो.)*

**डिगर :** *(बसत)* घरची आठवण! हे बेटे येतात तरी कशाला मग मरायला सैन्यांत? *(माशा मारण्याचा 'स्वॅटर' उचलतो.)*

**किवि :** त्याला ते काय करणार? त्यांचा म्होरक्या सैन्यांत शिरतो आणि मागून ते येतात. याची सारी जमात सैन्यांत भरती झाली. आणि आतां परत जायचंय याला. घरीं जायचंय.

**डिगर :** त्याला न् मला, दोघांना. *(माशी मारीत)* मेली शिंची!

**यांक :** मला तर वाटतं या माशा मोठ्या प्रमाणावर एकत्र पकडून कुणी तरी इथं सोडून देत असावं!

**डिगर :** ही तुझी—ठेव तुझ्याजवळ. *(एका माशीला टॉमीच्या दिशेनें तडाखा मारतो. या प्रयत्नांत टॉमीच्या तोंडावर 'स्वॅटर'चा फटका.)*

**टॉमी :** *(उठून ती माशी हुडकून तपासत)* हा, ही माझी नव्हे. ही साफ माझी नव्हे. मला वाटतं ही तुझीच. डोळ्यांत दर्द आहे तिच्या. *(ती डिगरकडे झटकतो.)* घरची आठवण.

**डिगर :** *(ती झटकीत)* तुझ्या माशा पुन्हां माझ्या अंगावर ढकलशील तर खबरदार! *(पुढें वाकून स्वॅटरचा फटका टॉमीच्या गुडघ्यावर हाणतो)*

**टॉमी :** *(रागानें डिगरकडे पहातो. मग स्वतःचा 'स्वॅटर' परजतो. आणि अचानक डिगरच्या तोंडावर मारतो. हें इथ रोजच चालत असावं—टॉमी हें केल्यावर हिशेब चुकता झाल्याच्या समाधानानं आडवा होतो. डिगर त्याला नवा फटका हाणतो. टॉमी तो तितक्याच आकस्मिकपणें परत करतो. त्यावर डिगरचा प्रति-फटका. असं आणखी एकदोनदां.)* धांवा! सिस्टर, हा मुलगा मला मारतो! *(दोघांचं स्वॅटरानिशीं द्वंद्वयुद्ध. अखेर टॉमी यांकची कॉट गांठतो.)*

**यांक :** हा असा जंतूंचा प्रसार करतां तुम्ही लोक.

**डिगर :** या जंतूंचा प्रसार मी वॉर्डभर करीन.

**किवि :** पुरे बाबांनो. सिस्टर आली तर वाट लावील सर्वांचीच.

*(मार्गेरेट ऑफिसांतून परत येते. टॉमी आणि डिगर पटापट उड्या मारून आपापली कॉट गांठतात, अंगावर पांघरूण घेऊन कांहीं घडलं नसल्यासारखे पडून रहातात.)*

**मार्गरेट** : *(ब्लॉसमकरतां हिनें मणी आणले आहेत. त्याशिवाय स्वच्छ अभ्रे, अंथरुणं. यांकच्या कॉटवर अभ्रे वगैरे ठेवून ब्लॉसमकडे मणी घेऊन जाते.) पुन्हा मला* स्वेटरनीं मारामारी करतांना कुणी दिसूं दे तर खरं—स्वेटर्स जप्त करीन! मग माशा खातील तुम्हांला!

**टॉमी** : म्हणजे—मला, सिस्टर?

**मार्गरेट** : आपापलं साहित्य काढून कामाला लागा बघूं सगळे जण. काम करा. *(ती परत ऑफिसांत जाते. किविचं अंग पुसून तस्त घेऊन यांक आत जातो. परत येऊन किविला किंचित् बसता करतो. मग मार्गरेटला मदत करूं लागतो. डिगरनें विणकामाचं सामान बाहेर काढल आहे. टॉमी भरतकामाचं साहित्य हातीं घेतो. मार्गरेट किविसाठीं असलं कांहीं एका बैठ्या स्टँडवरून आणून त्याच्या मांडीवर ठेवते. मग यांकचा बिछाना नव्या अभ्र्यानं नीटनेटका करते )*

**टॉमी** : *(हातचं काम करीत)* सिस्टर, आपल्याकडे पिवळा दोरा आहे का हो शिल्लक थोडा? फुलं सगळींच निळीं झालीं माझीं.

**मार्गरेट** : आहे त्यांत भागवा काय तें. *(टॉमीचं काम पाहून)* बरं दिसतं कीं. *(यांकचा बिछाना आवरीत)* तुमच्या हातचं हें भरतकाम पाहून बायकोला केवढा आनंद होईल तुमच्या.

**टॉमी** : *(खिदळत)* याचं काय करावं तेंच कळणार नाहीं तिला. आणि मग बहुतेक यांत नाक शिंकरील ती!

**मार्गरेट** : मग याऐवजीं एक टी-कोजीच कां नाहीं भरून पाठवीत तिला? तिच्यांत नाहीं नाक शिंकरणार ती. *(डिगरच विणकाम पहात)* हें तुमच्या बायकोकरता वाटत, डिगर?

**डिगर** : नव्हे. मुलाकरतां. तें कार्ट कसं असणार तें आधीं कळतं तर रंग तरी नक्की करतां आला असता.

**यांक** : म्हणजे पोर होणाराय का रे तुला?

**टॉमी** : *मला केव्हांपासून* माहीत आहे हें. *मंडळी*, आपण या डिगरशीं सध्यां हळूवारपणें वागलं पाहिजे.

**यांक** : अरे पण—तूं तर तीन वर्षे लांब आहेस घरापासून—आणि—म्हणजे —हें—

**डिगर** : *(ठामपणें)* मध्यंतरी इंग्लंडहून येतांना केपटाउनमध्यें लग्न झालं माझं.

**यांक** : अस्सं!

**टॉमी** : पहा कसं कुत्सितपणानं 'अस्सं' करतोय! ही जातच असली!

**किवि** : आपण पैज मारूं या का पैज? मी म्हणतों, या डिगरला पोरगा होणार.

**डिगर** : माझं कांहीं म्हणणं नाहीं.

**किवि** : पोरगी होणार असं कुणाला वाटतं?

**डिगर** : हां, पुरे! माझ्या पोरावर बेटिंग नको आहे मला.

**किवि** : *(पुन्हा हातचं काम चालू करीत)* हॅः! इथं कुणी पैजच मारायला तयार नसतं!

**मार्गरेट** : यांक, तुम्ही काय करतां आहां तें डिगरच्या मुलासाठींच कां करीत नाहीं तुम्ही?

**डिगर** : छेः छेः. कांहीं नको माझ्यासाठीं त्रास. *(ऑर्डर्ली येतो.)*

**ऑर्डर्ली** : *(मार्गरेटला)* या पेशंटला घेऊन इकडं यायला सागितलं होतं ओ. सी. साहेबानीं.

**मार्गरेट** : हो हो. कर्नल सांगून गेले होते. त्याचं सामान आणलं नाहींस?

**ऑर्डर्ली** : *(मागें पहात)* तोच येतोय घेऊन. मला हात लावूं देईना.

*(लॅची प्रवेश करतो. दाराशी थबकतो. बोचक खांद्यावर आणि हातांत हिरव्या झोळीत, वाजवायचा बॅगपाइप. अंगावर इस्पितळाचे कपडे. विशीचा तरुण. अंगानें सडपातळ. सैनिकाच्या मानानं किरकोळ वाटतो. केस चौफेर उभे. त्यांना एकच असं वळण नाही. डोळे निळे आणि रोखून पहाणारे. जिवणीच्या हट्टी ठेवणीत नाकडोळ्याचा नेटकेपणा बिघडलेला. भोवतालच्या गोष्टींत त्याला फारसा रस वाटलेला दिसत नाही.)*

**मार्गरेट** : हें सामान याना इथं बरोबर बाळगता यायचं नाहीं.

**ऑर्डर्ली** : ते म्हणतात, कर्नलनीं सांगितलंय ठेवा म्हणून.

**मार्गरेट** : बरं. *(रिकाम्या कॉटकडे जाते.)* ही तुमची कॉट. *(लॅची कॉटकडे येतो. उशाशी बॅगपाइपची हिरवी झोळी रचतो. बाकी बोचकं कॉटखाली ठेवतो.)*

**ऑर्डर्ली** : हा यांचा रिपोर्ट. *(तिच्या हाती देऊन निघून जातो. लॅची कॉटच्या पायथ्याकडे बसला आहे.)*

**मार्गरेट** : *(रिपोर्ट घेत)* थँक यू. *(लॅचीला)* मी सिस्टर मार्गरेट. मला वाटतं, तुमचं नाव काही कर्नलनीं मला सांगितलेलं नाहीं—*(लॅची स्वस्थ. म्हणून त्याचा रिपोर्ट न्यहाळते.)* सार्जंट लॅचलेन मॅक्लॅचलेन. स्कॉट का तुम्ही ?

**लॅची** : *(बोलण्यांत स्पष्ट स्कॉटिश ढब)* स्कॉट नसतो तर स्कॉट नांव कशाला लावलं असतं मी ? *(यांक जरा दचकून पाहूं लागतो )*

**मार्गरेट** : तसं नव्हे. चांगली वाटतात म्हणून कुणी कुणी आपल्या मुलांना स्कॉटिश नांवं ठेवतात.

**लॅची** : त्यांत अर्थ नाहीं. खरं तें लपत नसतं. *(पुन्हां समोर पहात गप्प.)*

**मार्गरेट** : पण स्कॉट लोकांविरुद्ध ठरवून केलेला तो कट असेल असं नाहीं मला वाटत. *(त्याच्याकडे जाऊन)* कर्नलनीं तुम्हाला बसायची परवानगी दिलीय. वाटलं तर तुम्ही बिछान्यांत पडूनहि राहूं शकता. तुम्हांला जसं आवडेल तसं करा.

**लॅची** : बसूनच जरा चिंतन करीन मी.

**मार्गरेट** : आतां तुम्हाला कांहीं हवं आहे का ?

**लॅची** : *(तिच्याकडे पहात)* माझ्यासाठीं कुणी कांही केलेलं आवडत नाहीं मला.

**मार्गरेट** : खरंच ? मला कुणी आपण होऊन माझ्याकरतां कांहीं करणारं भेटेल तर आवडतं.

**लॅची** : असेल. तुम्हांला आवडत असेल. मला नाहीं आवडत. *(समोर पहात बसतो.)*

**मार्गरेट** : कांहीं लागलं तर हांक मारा मला. हे रिपोर्ट्स ऑफिसमध्यें नेऊन जरा चाळतें मी. *(ती जाते. लॅची गप्प बसून रहातो. इतर जण आपापल्या कामांत किंचित्काळ गर्क होतात. यांक थोडासा कचरून अखेर लॅचीपुढें सिगरेटचं पाकीट करतो.)*

**यांक** : घ्या—एक घ्या—

**लॅची** : *(काय तें एकदां पाहून घेतो, मग समोर पहात)* नको. आहेत माझ्याकडे.

**यांक** : या इथल्या नव्हेत. घरून आलेल्यांतल्या उरल्या त्या या आहेत.

**लॅची** : सवंय नसलेलं कांहीं मला चालत नाहीं.

**यांक** : पण जरा एक ओढून तर पहा—

**लॅची** : मला कुणाचं फुकट नको.

**यांक** : कां नको ?

**लॅची** : *(त्याच्याकडे वळून ठांशीवपणें)* कुणाचं ऋण नको आहे मला !

**यांक** : एक सिगरेट म्हणजे कांहीं भलं मोठं ऋण नव्हे. *(पुन्हा सिगरेट पुढें धरतो.)*

**लॅची** : *(समोर पहात)* मी माझ्याजवळची ओढीन. *(खिशांतून सिगरेट काढून शिलगावूं लागतो. काम करणारे पेशंट्स् काम खाली ठेवतात. यांक आपली सिगरेट बाजूला ठेवतो.)*

**डिगर** : *(खास ऑस्ट्रेलियन पद्धतीनं)* हे—जॉक ! *(लॅची सिगरेट शिलगावतां शिलगावतां थबकतो.)*

**यांक** : *(लॅचीला)* तुम्हांला म्हणतोय तो.

**लॅची** : जॉक नव्हे माझं नांव. *(शांतपणें सिगरेट शिलगावतो.)*

**डिगर** : सगळ्या स्कॉट्सना जॉक म्हणतों मी.

**टॉमी** : *(त्याच्या मदतीला येत)* जसे सगळे ऑस्ट्रेलियन्स हे डिगर, न्यू-झीलंडर्स किवि, इंग्लिशमेन टॉमी आणि तो—*(यांककडे निर्देश.)* तो यांक.

**यांक** : *(टॉमीला)* हां, मी यांक नव्हे. मी जॉर्जिआचा.

**लॅची** : मला हांक मारायची असेल तर नांवानं हांक मारत चला माझ्या.

**डिगर** : सिस्टर कांहीं तरी म्हणाली खरी—पण नीट ऐकलं नाहीं मी. काय नांव तुमचं ?

**यांक** : लॅचलेन—का कांहींतरी.

**डिगर** : ठीक ठीक—'लॅची'. आतां ? आतां झालं ?

**लॅची** : *(त्याच्याकडे वळत)* बोला. कशाला हांक मारलीत तुम्ही मला ?

**डिगर** : कांहीं नाहीं—वाटलं कीं जरा बोलूं आपण.

**लॅची** : उदाहरणार्थ कशाबद्दल ?

**डिगर** : कशाबद्दल म्हणजे—अमक्याचबद्दल असं नव्हे—गप्पा.

**लॅंची** : वायफळ बडबडण्याची संवय नाहीं मला. *(समोर पहात बसतो.)*

**यांक** : स्कॉट आहांत खरे तुम्ही. *(हंसण्याचा एक प्रयत्न करतो. बसल्या बसल्या कॉटवरून पाय उंच करून लॅंचीसमोर येतो. पुन्हा नवा प्रयत्न करतो.)* कोणत्या रेजिमेंटमध्यें असतां तुम्ही ?

**लॅंची** : मी ? कां ?

**यांक** : कां म्हणजे—उत्सुकता. तुमच्या रेजिमेंटमध्यें माझ्या कुणाशीं ओळखी आहेत का पहावं म्हणून.

**लॅंची** : *(त्याला न्यहाळत)* तुम्ही कोण ? स्कॉट ?

**यांक** : आजोबा स्कॉट होते माझे.

**लॅंची** : मग ते नाहींत माझ्या रेजिमेंटमध्यें. *(समोर पहात मख्ख बसतो.)*

**यांक** : *(तोल सुटूं पहातो.)* आजोबा कुठं आहेत तें आहे हो माहीत मला—ते आमच्याच गांवीं जमिनीखाली पहुडलेले आहेत. पण ॲम्ब्युलन्स चालवण्याचं काम करतों मी, त्यामुळें बऱ्याच रेजिमेंट्समध्यें ओळखी होतात. तुमचे-आमचे दोस्त कोणी सांपडतील म्हणून चौकशी केली मी.

**लॅंची** : तें अशक्य. मैत्री फार जपून करतों मी.

*(यांक कॉटवर सपाट आडवा होतो. लॅंची सिगरेट फुंकत बसतो. मग बुटावर दाबून ती विझवतो, ती विझली आहे याची खात्री करून घेतो आणि थोटुक खिशांत सरकवतो. उठतो. बोचकं खोलतो. टॉवेल काढतो. त्यांत असतं दाढीचं सामान, टूथब्रश. जवळच्या फडताळांत तें सर्व नीट ठेवून देतो. यांक त्याच्या फडताळांतून चॉकलेटचा बार काढतो. क्षणभरानें किवि एक पुस्तक लॅंचीच्या कॉटवर टाकतो.)*

**किवि** : घ्या—हें पहा जरा चाळून.

**लॅंची** : *(पुस्तक उचलून किविच्या कॉटवर टाकीत)* पुस्तकांत अर्थ नसतो.

**यांक** : जरा वेळ स्वतःला विसरायला नाहीं आवडत वाटतं तुम्हांला ?

**लॅंची** : तें कशाला ? माझं माझ्याशीं कुठलंच भांडण नाहीं. विचार करूं शकणाऱ्यानं वाचणं म्हणजे काळाचा अपव्यय.

**यांक** : अस्सं. तर मग तुम्ही विचार करूं शकतां.

**लॅंची** : हो. *(पाठ टेकण्याकरतां तक्क्यासारखं बोचकं उशाशीं घेतो.)*

**यांक** : *(किंचित् आशेनें)* बायबलबद्दल बोलूं या का आपण ?

**लॅंची** : कांहीं नको.

**यांक** : म्हणजे धार्मिक भाग सोडा हवा तर; पण त्यातला कांहीं काही भाग असा काव्यात्मक आहे म्हणतां—

**लॅंची** : काव्यांत अर्थ नाहीं. मग तें कसलंहि असो.

**यांक** : हें बघा, *(उठून लॅंचीपुढें उभा रहातो.)* इथें वातावरण मोठं खेळी-मेळीचं असतं आमच्यात. तुम्हाला पुस्तकं, काव्य नको असेल तर कांहीं हरकत नाहीं. आमचं कांहीं म्हणणं नाहीं—

**लॅंची** : *(बोचक्याला टेकून हात पुढं बांधून)* असलं तरी उपयोग नाहीं.

**यांक** : म्हणजे माझं म्हणणं इतकंच कीं—'जगा आणि जगूं द्या' हें तत्त्व अखेर मोठं चांगलं तत्त्व आहे. काय ? *(चॉकलेट पुढें करीत)* घ्या.

**लॅंची** : *(तें न्यहाळीत)* हें काय माझ्यापुढं नाचवतां आहां तुम्ही तें मला कळेल का ?

**यांक** : हा चॉकलेटचा बार. खातात. घ्या—घ्या कीं.

**लॅंची** : *(यांकला)* चांगला नाहीं हा ?

**यांक** : चांगला आहे कीं. फार रुचकर आणि पौष्टिक आहे. नाही तर कशाला देतोंय मी हा तुम्हांला ?

**लॅंची** : कशाला देतां ?

**यांक** : कारण मला हा हवा आहेच—पण मला वाटतं कीं तुम्हांला याची माझ्याहून जास्त गरज आहे. यात कसला अपमान आहे तुमचा ? कीं हिणवण्याचा हेतु आहे तुम्हांला ?

**लॅंची** : *(समोर पहात)* तर्काला पटत नाहीं.

**यांक** : *(इतरांकडे पहात आपल्या कॉटवर उताणा होत)* आजोबांनीं पुन्हा अवतार घेतला, वाटतं !

**किवि** : *(क्षणभर गप्प राहून मग)* लॅंची, तुम्ही कधीं न्यूझीलंडला आलां आहांत का ?

**लॅची** : *(विरक्तपणें)* थोडा फार प्रवास केलाय मी तसा. पण रानटी आणि मागासलेला मुलूख मिशनऱ्यांकरतां सोडीत आलोंय मी.

**किवि** : न्यूझीलंड बिलकुल रानटी मुलूख नाहीं—मी तिथलाच कीं.

**लॅची** : *(किविला न्यहाळतो—मग समोर पहात)* या युक्तिवादांत तथ्य वाटत नाहीं.

**टॉमी** : *(मजेंत)* किवि, हाणला तुला नेमका !

**किवि** : केव्हां तरी फार पूर्वीं असेल न्यूझीलंड रानटी. पण ती झाली फार जुनी गोष्ट. आतां तें अगदीं अद्ययावत् झालं असून चांगलं सुधारलं आहे.

**लॅची** : असं तुमचं मत.

**किवि** : आणि परत, आम्ही आमचे मुखत्यार आहोंत—स्कॉटलंडचं असं कुठं आहे !

**लॅची** : *(त्याच्याकडे वळत)* फिजी बेटावरच्या रहिवाशांचे तुम्ही शेजारी, होय ना ?

**किवि** : असूं. मग ? त्याचा काय संबंध ?

**लॅची** : संबंध तुम्हांला नाहीं समजणार. हे फिजी लोक नरमांसभक्षक आहेत, खरं कीं नाहीं ?

**टॉमी** : अगदीं खरं बोललांत ! एकमेकांना अख्खे उकडून खातात लेकाचे !

**किवि** : मी फिजी लोकांना तसं ओळखत नाहीं.

**लॅची** : आतां माझा युक्तिवाद असा, कीं आमचे शेजारी आमच्या दुर्दैवानें इंग्लिशमन असले तरी ते अजून एकमेकांना उकडून खाऊं लागलेले नाहींत. निदान जाहीरपणें तरी ते असलं कांहीं करीत नाहींत.

**टॉमी** : *(ताड्दिशीं बसता होऊन)* माझा यावर आक्षेप आहे ! इतिहासाची साक्ष काढायची तर—मला आठवतं त्याप्रमाणें हे स्कॉट लोकच आमच्या सरहद्दींत घुसून आमचीं गुरं चोरीत. तेच चोर होते !

**लॅची** : हूं—इंग्लिश गुरांची दरिद्री निपज स्कॉटलंडमध्यें आज अस्तित्वांत नसती तर स्कॉटलंडचं वैभव किती तरी अधिक असतं.

**टॉमी** : *(तोल सुटून ओरडत)* यू आर ए ब्लडी पार्ट ऑफ द ब्रिटिश ब्लडी एम्पायर !

**लॅची** : *(टॉमीला)* पण मिळवलंत कसं तुम्ही हें एम्पायर ऊर्फ साम्राज्य !

**टॉमी** : जंगली रानवटांना जिंकून !

**लॅची** : *(उसासत)* तुम्हां इंग्लिश लोकांचा हा पोकळ डौल ! कांहींसुद्धां जिंकलं नाहींत तुम्ही. तुमच्या वसाहती—स्कॉटलंड वगळून—कशा जमवल्यात तुम्ही तें ऐकायचं आहे माझ्याकडून ?

**टॉमी** : सैन्यबळावर जिंकून घेतल्या आम्ही त्या !

**लॅची** : त्यापेक्षां मिशनऱ्यांकरवीं बळकावल्यात. प्रथम एकादी सुपीक वसाहत हेरून तिथं मिशनरी पाठवतां तुम्ही. तिथल्या बापड्या मागासलेल्या लोकाना प्रभूची प्रार्थना करायला शिकवतां. आणि एकदां असे ते यासाठीं कण्यांत वांकले कीं रोवलंतच तुम्ही तुमचं निशाण आणि पाऊल त्यांच्या मानगुटीवर.

**टॉमी** : तुम्ही आमच्या जितांपैकींच ! अद्याप वीज आणि होमरूलसाठीं भांडतां.

**डिगर** : लॅचीचं म्हणणं बाकी रास्त आहे, टामी. आमच्या ऑस्ट्रेलियाला प्रथम तुमचे मिशनरीच आले. *(लॅचीला)* भलते हुशार आहां बुवा तुम्ही.

**लॅची** : *(डिगरला न्यहाळीत)* तुम्ही ऑस्ट्रेलियाचे ?

**डिगर** : हो. प्रत्यक्ष नंदनवन आहे आमचा ऑस्ट्रेलिया.

**लॅची** : अतिशयोक्ति ! लांब उड्या मारणाऱ्या भल्या मोठ्या घुशींशिवाय आहे काय असं तुमच्या देशांत ?

**डिगर** : *(रागानें)* कांगारू म्हणा. घूस काय म्हणतां ?

**किवि** : *(संतापून)* आणि न्यूझीलंड पण मागासलेला देश नव्हे.

**लॅची** : *(किविला)* तुमच्या देशाचं वैशिष्ट्य काय हो ? किवि—बिनपंखांचा पक्षी—उडतां न येणारा पक्षी.

**यांक** : *(किविला आणि डिगरला मजेनें)* मला वाटतं, निरुत्तर केलंय त्यांनीं तुम्हांला. आमच्या अमेरिकेंत पहा ! कांगारूहि मिळणार नाहींत आणि न उडणारे पक्षीहि नाहीं मिळणार.

**लॅची** : *(दयार्द्र सुरांत)* अरेरे ! अमेरिका ! मिकी माउस नांवाच्या उंदराची भूमि. श्रीमंत देश—पण तुम्हांला जगावं लागतं पत्र्याच्या डब्यांतलं अन्न ओरबाडून आणि दहा सेंटवाल्या दुकानांतल्या पदार्थांवर ! लोणच्यांसारखे तिथें चर्चेसचे प्रकार ! पण पूजा मात्र व्हिटॅमिन्स आणि सिनॅट्राची !

**यांक** : *(खराखुरा संतापून)* घोर अज्ञानांत आहां तुम्ही!

**लॅंची** : असं? ग्लासगोचं नांवहि नसेल आलं तुमच्या कानावर. तिथून बाराव्या वर्षी निघालों तेव्हां थंडीचे चार महिने तुमच्या न्यूयॉर्कमध्यें काम केलं होतं मी. फार जवळून परीक्षा केल्यय मी तुमची. कवडीची किंमत देत नाहीं मी तुम्हां लोकांना. मात्र यांत व्यक्तिगत द्वेष बिलकुल नाहीं.

**यांक** : आपला सहवास फारसा सुखाचा होईलसं दिसत नाहीं. *(ब्लॉसम जागचा उठतो )*

**टॉमी** : त्याची बाजू घ्यायला हवी नाहीं का? आतां बरी जिरली!

**किवि** : हें बघा, हें असं आपापसांत एकमेकांवर चिडणं पुरे झालं—वेडेपणा होतो आहे हा. *(ब्लॉसम लॅंचीच्या दिशेनें येऊं लागतो )*

**लॅंची** : *(ब्लॉसमला न्यहाळीत)* हा ब्रिटिश प्रजाजन कोण?

**यांक** : या वॉर्डातला एकमेव भाग्यवान माणूस. याला इंग्रजी समजत नाहीं.

**लॅंची** : काय हवं आहे त्याला?

**यांक** : तुमच्याकडे पहायचं आहे त्याला. असलं कांहीं पूर्वी कधीं पाहिलेलं नाही त्यानं. *(सगळे लॅंचीचा नाद सोडून काम हातीं घेतात. ब्लॉसम आपल्या जागी जाऊन मणी ओवूं लागतो पाण्याची बाटली घेऊन तेवढ्यांत मार्गरेट आंतून येते भोवती पहाते )*

**मार्गरेट** : काय मंडळी—कसं काय? *(कुणाचंच उत्तर नाही. लॅंचीकडे जाते.)* वॉर्डातल्या माणसाशीं ओळखी झाल्या कीं नाही तुमच्या? हे यांक...

**यांक** : झाली आहे ओळख.

**मार्गरेट** : *(लॅंचीला)* सगळ्यांची ओळख करून दिली तुमच्याशीं?

**यांक** : सगळे दोस्त झालों आहों आम्ही आतां.

**मार्गरेट** : *(लॅंचीच्या कॉटशी असलेल्या फडताळावर पाण्याची बाटली ठेवते.)* कांहीं हवं आहे का तुम्हांला माझ्याकडून? पाहिलात विचार करून? घेतलात शोध?

**लॅंची** : माझ्या रेजिमेंटमध्यें मला परत पाठवण्याचा अधिकार थोडाच आहे तुम्हांला?

**मार्गरेट** : हें पाहा, त्यासाठीं जरा दम काढावा लागेल तुम्हांला. वाट पाहावी लागेल. यथावकाश होणारच आहे तें.

**लॅची** : वाट तर पहातोंच आहे—पण दम नाहीं काढणार.

**मार्गरेट** : कोणत्या रेजिमेंटमध्यें आहांत तुम्ही ?

**यांक** : याबाबत फारशी माहिती तुम्हांला मिळण्याचा संभव नाहीं, सिस्टर. अर्थात् तुम्ही स्कॉट असाल किंवा तुमचा आजोबा ह्यात असेल तर गोष्ट निराळीं.

**लॅची** : *(यांककडे वळत)* माझ्या गुद्द्याचा तडाखा चाखून पहायचा आहे का तुम्हांला ?

**मार्गरेट** : यांक—हीच का तुमची शिष्टाचाराची कल्पना ? झालंय काय तुम्हांला ?

**लॅची** : अमेरिकन माणसाकडून शिष्टाचाराची अपेक्षाच व्यर्थ.

**यांक** : आतां असला एकच आणखी शेरा—आणि सहनशक्ति संपणार आपली ! *(तोंड फिरवतो.)*

**मार्गरेट** : *(उशीशीं चाळा करीत)* पुरे. स्कॉटलंडबद्दल बोलूं या आपण. लॅची, तुम्हांला एरशायर आहे का माहीत ?

**लॅची** : माहीत ! माझं कार्ड पाह्यलंय तुम्ही. माझा जन्म एरशायरमध्यें झाला.

**मार्गरेट** : खरं ! मला कल्पना नव्हती. एरशायर आणि डून फूटची मला चांगली माहिती आहे.

**लॅची** : पण स्कॉट नव्हेत तुम्ही !

**मार्गरेट** : तिथं मास्तरीण होतें मी. फार गोड मुलं होतीं तिथलीं.

**लॅची** : *(जरा गप्प राहून)* हूं.

**मार्गरेट** : शेतीवाडी तरी किती रमणीय !

**लॅची** : *(अधिक वेळ गप्प राहून)* हूं.

**मार्गरेट** : आतां तुम्ही कॅमेरॉन हायलॅंडर्सपैकीं असं सांगूं नका मला. मला नाहीं तें खरं वाटणार.

**लॅची** : माझं रेकॉर्ड पाह्यलंय तुम्हीं.

**मार्गरेट** : खरंच कॅमेरॉनपैकीं तुम्ही ?

**लॅची** : होय.

**मार्गरेट** : खोटं !

**लॅची** : ऐकूं कमी येतं वाटतं तुम्हांला ?

 लोभ नसावा, हे विनंति !

**मार्गरेट** : भलतंच नवल वाटतं आहे मला. फार चांगली आणि मोठी शूर रेजिमेंट आहे ती.

**लॅची** : बऱ्यापैकीं आहे.

**मार्गरेट** : तुमचा तो स्कॉट लोकांचा खास पोशाख—तुमचं किल्ट—घागऱ्यासारखं—गुडघ्यापर्यंत असतं तें—आणलं आहे कीं नाहीं तुम्ही बरोबर? *(लॅची गप्प.)* तुम्ही तें वापरतां ना?

**लॅची** : हूं.

**मार्गरेट** : आम्हांला सर्वांना पहायला मिळावं म्हणून एकदां वापराल का तें इथं? *(इतरांना)* मंडळी, या लॅचींना त्यांच्या किल्टमध्यें पहायला आवडेल कीं नाहीं सर्वांना?

**यांक** : हो हो तर! मला तर आतां धीर निघणार नाहीं.

**मार्गरेट** : *(लॅचीला)* फारच मजा! टोपी एका डोळ्यावर तिरकी बसवलेली आणि किल्ट चालतांना खसफसतं आहे—मोठी मजा येत असेल नाहीं? खूप कुणी तरी मोठं असल्यासारखं वाटत असेल.

**लॅची** : *(क्षणभर स्तब्ध. मग)* माझ्याकडे किल्ट नाहीं. *(यांक अपेक्षाभंग झाल्यासारखा लॅचीकडे पाहूं लागतो.)*

**मार्गरेट** : असं कसं होईल? असायला हवं.

**लॅची** : नाहीं—माझ्याकडे नाहीं. *(डिगर लॅचीकडे पहातो.)*

**मार्गरेट** : पण तुम्ही तर कॅमेरॉन्समध्यें आहांत आणि तुम्हाला किल्ट वापरायला मुभा आहे. असं असतांना—असले कसले तुम्ही स्कॉट!

**लॅची** : पैसे आम्हांला मोजावे लागतात किल्टचे. आणि चांगल्या किल्टला बरेच पैसे पडतात.

**मार्गरेट** : रेजिमेंटतर्फे तुम्हांला किल्ट वाटत नाहींत? *(टॉमी लॅचीकडे पहातो आहे.)*

**लॅची** : आम्हांला फक्त युनिफॉर्म वाटतात.

**मार्गरेट** : तरीहि मी तुमच्या रेजिमेंटमध्यें असतें तर—कितीहि पैसे पडले असते तरी एक मस्तपैकीं किल्ट विकत घेतलं असतं. स्कॉट्समनला किल्ट हवंच.

**लॅची** : तुम्ही बाई आहांत; तुम्ही केलं असतंत वाटेल तें. मी माझ्या पैशाचा अधिक उजवा उपयोग करतों.

**मार्गरेट** : *(त्याच्या जवळ जात)* लॅचलेन, तुम्ही चार एक वर्षं तरी घरापासून लांब आहांत, नव्हे का?

**लॅची** : हो, सतराव्या वर्षापासून.

**मार्गरेट** : पगाराचे सगळे पैसे खर्च केले नसतील तुम्ही. कांहीं तरी शिल्लक टाकलीच असेल.

**लॅची** : स्कॉटलंडमध्यें आहे माझी शिल्लक.

**मार्गरेट** : जरूर लागली तर मागवून घेता येईल ती इकडे—नाहीं का?

**लॅची** : भुईतून उकरून थोडीच काढतां येणार ती?

**यांक** : तरी मला वाटलंच होतं! पैसे पुरून ठेवले आहेत बेट्यानं पत्र्याच्या डब्यांत घालून!

**लॅची** : *(पाण्याची बाटली उचलून)* आतां गप्प बसाल का? का हाणूं डोक्यांत?

**मार्गरेट** : *(यांककडे वळत)* यांक—बरं नसेल वाटत तर पडून रहावं. पण जरा सुसंस्कृतपणानं वागावं. *(लॅचीकडे वळते.)*

**लॅची** : *(बाटली तिच्या जागीं ठेवीत)* खाली खिशानीं, जखमांचे वण मिरवीत स्कॉटलंडला परत जायचं नाहीं मला. माझे पैसे जमिनींत गुंतवले आहेत मी. जमिनीचा मालक होणार आहें मी. मालकीचं घर पण बांधलं आहे. *(खिडकीशी जाऊन बाहेर पहात उभा सारे ऐकताहेत, पहाताहेत. सारे एकाएकीं भारावलेले.)*

**मार्गरेट** : अस्सं!

**लॅची** : तुम्हांला नसेल पसंत माझी कल्पना. पण हक्काच्या शेतीवाडीपेक्षां या जगांत आणखी सुंदर काय आहे? कष्ट करावेत, पीक काढावं. दोन वेळां सुखाचा घांस खाऊन हक्काच्या घरांत, उरलेलं आयुष्य संतुष्टपणें जगावं. *(खिडकीबाहेरच पहातो आहे.)*

**मार्गरेट** : मिळणारे सगळे पैसे जमिनीच्या हप्त्यांतच जातात तुमचे?

**लॅची** : हो. चैनीच्या खाण्यापिण्यांत माझा एक छदाम खर्च केलेला नाहीं मी.

**मार्गरेट** : मग आतां हप्ते संपत आलेयत कीं नाहींत?

**लॅची** : आणखी दोन-एक महिन्यांत संपतील. मग जमीन माझी मालकीची!

**मार्गरेट** : *(क्षणभरानें)* मी म्हणतें तुम्ही एकदां खूप अविचारीपणानं कां नाहीं वागत, लॅंची ? कां एक किल्ट विकत घेत नाहीं तुम्ही छानपैकीं ! जमीन काय, आहेच.

**लॅंची** : किल्टहि आहेच. प्रथम जमीन.

**किवि** : भागींत जमीन खरीदता आहां कीं एकट्याच्या ताकदीवर ?

**लॅंची** : *(त्याला)* भागीबिगी कुछ नाहीं. *(खिडकीबाहेर नजर. डिगर, टॉमी, किवि हातच्या कामांत लक्ष गुंतवतात. यांकहि तेंच करतो.)*

**मार्गरेट** : एकटेच तुमच्या शेतीवाडीवर रहाणार तुम्ही ?

**लॅंची** : हो. एकटा.

**मार्गरेट** : एकलकोंडं नाहीं वाटणार तुम्हांला ?

**लॅंची** : मला कधींच एकलकोंडं वाटलेलं नाहीं.

**मार्गरेट** : तुम्हांला काय हवं तें तुम्हांला समजलं आहे हें कबूल केलंच पाहिजे. *(इतरांना)* सारेच आज फार कामांत दिसतां.

**यांक** : मधमाशांसारखे—प्रत्येक क्षणाचा सदुपयोग करीत !

*(जोरजोरानें काम करतो. मार्गरेट आंत जाते. लॅंचीची नजर खिडकीबाहेर. सारे आळीपाळीनें, कामांतून नजर काढून त्याच्याकडे पहातात.)*

**यांक** : शेतीवाडी करून तिथं एकटंच राहून जगाला हिणवण्यात काय मौज वाटते हो तुम्हांला ?

**लॅंची** : तुम्हांला बोलायला लावण्याची आतां बिलकुल इच्छा नव्हती माझी.

**यांक** : पण एक प्रश्न विचारतों मी—एकच—त्याचं उत्तर द्याल ? त्रास करून न घेतां ?

**लॅंची** : मला कशाचाच त्रास होत नाहीं. विचरा तुमचा प्रश्न. एकच प्रश्न.

**यांक** : थॅंक्स. उपकार झाले तुमचे. *(कॉटवरून पाय उचलून—त्याच्या बाजूला मोहरा आणून)* तुमच्या पोटांत कां दुखतं आहे ?

**लॅंची** : पोटांत कुठं दुखतं आहे ? काय तें सरळ साध्या भाषेंत म्हणा.

**यांक** : तुमच्याहून माझा पाळीव पोपट जास्त उजवी भाषा बोलतो.

**लॅंची** : त्याच्यापासून तुम्ही थोडं तरी शिकायचं होतंत !

**यांक :** *(स्वतःला आवरीत)* तुम्ही एवढे कडवटपणानं कां बोल्तां, वागतां तें हवं होतं मला. एकादा आपल्याशीं स्नेहानं वागूं लागला तर उलट त्याच्याशीं स्नेहानंच वागायला हवं आपण. तुम्हांला तें कां जमत नाहीं?

**लॅची :** तुम्ही सगळे स्नेहानं वागतां आहां माझ्याशीं?

**यांक :** हो तर काय. समजलेलं नाहीं तुम्हांला?

**लॅची :** मग आधींच सरळ तसं सांगायचंत. तुमचा बराच त्रास आणि वेळ मीं वांचवला असता. मला स्नेहाची गरज नाहीं. माणसाविषयीं मला प्रेम नाहीं. कुणी माझ्या गोष्टींत ढवळाढवळ करणं मला आवडणार नाहीं. *(पलंगावर बसतो.)*

**यांक :** *(त्याच्या पुढें पुन्हा जाऊन)* तर मग कसली गरज आहे तुम्हांला? कशाविषयीं प्रेम आहे?

**लॅची :** वाटलंच होतं, तुम्ही पुन्हा दुसरा प्रश्न विचारणार म्हणून. *(यांकवर नजर रोखून रागानें)* जरा विचार करतांत तर तुमचं तुम्हांला कळलं असतं तें. मला गरज आहे एकांताची. मला प्रेम आहे एकटेपणाविषयीं. एकटं रहायचं आहे मला.

**यांक :** *(तापत)* मग रहा एकटे! *(ब्लॉसमला खुणावतो आणि स्वतःहि तरातरा आडोशाचे पडदे सरकवूं लागतो. लॅचीला हे दोघे मिळून या पडद्यांच्या योगें प्रेक्षकांपासून आणि इतर पेशंट्सपासून तोडून टाकतात.)* बरं का बंधू, बसा एकांतांत मजेंत आणि मरा! आमच्या लेखीं तुमचं अस्तित्व संपलं, बस्स? *(ब्लॉसम त्याच्या कॉटवर येऊन बसतो.)*

**लॅची :** *(पडद्यावर मुंडी दिसते.)* मी कुणाचा बंधू नव्हे. *(मुंडी अदृश्य. यांक त्याच्या कॉटवर उताणा पडतो.)*

**यांक :** बिनधारेचा वस्तरा कुणाकडे आहे? साला गळाच कापून घेतों!

**टॉमी :** *(पडद्याकडे निर्देश करीत)* सिस्टरला हें आवडणार नाहीं.

**यांक :** त्याच्या मनासारखं तर झालंय ना?

**टॉमी :** *(शिवणकाम बाजूला ठेवून साश्चर्य)* त्याला कुणीच आवडत नाहीं! त्याचा त्याला देखील तो आवडत नाहीं! काय माणूस आहे!

**डिगर :** *(यांकला)* आणि काय रे यांक, ऑस्ट्रेलियावर कसला विनोद मारलास तूं मघांशीं तो?

**किवि** : आणि न्यूझीलंडबद्दल एकमत झालं तुझं आणि त्याचं !

**यांक** : जाऊं द्या रे.

**टॉमी** : *(आडवा होत)* हूं. गुरं चोरणारे लेकाचे !

*(आडोशाच्या पडद्यामागें बॅगपाइपचे जोरदार सूर घुमूं लागतात. सगळे जागच्या जागीं शहारतात. पडद्यांखालीं लॅचीची तंगडी स्वतःच्या बॅगपाइप-वादनाला जोरजोरानं ताल देते आहे.)*

**यांक** : *(टॉमीला)* काय रे हें ?

**टॉमी** : हा मी नव्हे. अजून झोंपलोंसुद्धां नाहीं मी. *(यांक त्याच्या कॉटवर खडा होतो, पडद्यांवरून आंत डोकावतो—)*

**यांक** : बॅगपाइप ! *(दोन्ही कुशी गच्च पकडून डोळे मिटून दांत-ओठ खात)* जेनेसिस, एक्सोडस, लेव्हिटिकस, नम्बर्स, ड्युटरोनॉमी, जोशुआ, जजेस...

**पडदा**

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

*[तोच देखावा. पंधरवड्यानंतर.*

*ब्लॉसम हातीं बनवलेलं 'गिटर'सारखं आपलं वाद्य छेडीत खिडकीशी बसला आहे कसलं तरी आफ्रिकन गीत तो गुणगुणतो आहे.*

*किविचा हात आतां प्लॅस्टरमधून मोकळा झाला आहे. त्याच्या अंगावर आतां अप्-पेशंटचा पोषाख. यांकच्या कॉटवर तो बसला आहे, माशा मारण्याच्या 'स्वॅटर'नें वारा घेतो आहे.*

*डिगरहि आतां अप-पेशंट आहे. हा माशा मारीत उताणा पडला आहे.*

*टॉमी गुडघ्याशी रायटिंग पॅड घेऊन पत्र-लेखनांत मग्न.*

*किवि त्याच्या कॉटवर उताणा आहे.*

*यांक उपडी पडला आहे त्याच्या कॉटवर.*

*लॅची त्याच्या बिछान्यांत बसला आहे आणि बुटांना पॉलिश करण्यांत गढला आहे त्याच्या बॅगपाइपचं धूड त्याच्या कॉटशी एका खुंटीला लटकत आहे.*

*पडदा वर जातो तेव्हां ब्लॉसमचं गुणगुणणं बरंच वाढलेलं असतं.]*

**डिगर :** गप् रे! *(ब्लॉसम संकोचून गुणगुणणं थांबवतो. शांतता होते. लॅची एक बूट खाली ठेवून दुसरा उचलतो. त्यावर थुंकतो आणि त्याला पॉलिश करूं लागतो. ब्लॉसम आपलं वाद्य कॉटखाली ठेवतो आणि खिडकीबाहेर पहात रहातो.)*

**टॉमी :** आज तारीख किती ? *(कुणीच उत्तर देत नाहीं.)* अरे सांगा ना कुणी तरी. यांक, तारीख किती ?

**यांक :** *(पहात)* थर्टी डेज हॅज सप्टेंबर, एप्रिल जून अँड नोव्हेंबर. उरलेल्यांचे एकतीस दिवस. याला अपवाद फेब्रुआरी. याचे असतात अठ्ठावीस. क्वचित् एकोणतीस. आज पहिली तारीख.

*(पुन्हा उपडा आणि सपाट होऊन कंटाळ्याचा उपभोग घेऊं लागतो. टॉमी पत्र संपवून पाकिटांत घालता आणि पाकीट बंद करून नजीकच्या फडताळावर ठेवतो. 'स्वॅटर' उचलून कांहीं तरी हेरूं लागतो...मग डिगरलाच झडपतो.)*

**डिगर :** ओय—*(उपडी होतो. टॉमी विरक्तपणें माशा मारीत रहातो. किवि जागचा उठून डावीकडे निघतो.)*

**टॉमी :** वाजले किती ?

**किवि :** *(रिस्ट-वॉच पहात)* साडेअकरा. *(कॉटच्या उजवीकडे येऊन बसतो.)*

**टॉमी :** घ्या! मला वाटलं टिफिनची वेळ झाली!

**डिगर :** *(तिखट सुरांत)* कधीं विसरतांच येत नाहीं का रे तुला तुझी ढेरी?

**टॉमी :** आमच्यवारचं प्रेम पातळ झालं मंडळीचं. एरवीं असं कधीं बोललं नव्हतं कुणी. *(खिदळूं पहातो, पण जमत नाहीं)*

**यांक :** इथून चालतं व्हायला आवडेल आपल्याला. *(मार्गरेट येते. मुद्रेवर उल्हास.)*

**मार्गरेट :** छान दिवस आहे कीं नाहीं आजचा! *(कांही पत्रं दाखविते.)* आत्तांच टपाल आलं. *(सगळे उठून बसतात. किवि उठून उभा रहातो.)*

**यांक** } पत्रं!
**टॉमी** } आयला! आत्तां हें मीं एक लिहून पुरं केलं!
**डिगर** } आह, विझर्ड!
**किवि** } माझं कांहीं आहे का?

**किवि :** पैज मारतों, माझं पत्र आज नक्कीच असणार.

**यांक :** जरा नीट पहा, सिस्टर—

**मार्गरेट :** एक मिनिट शांत राहा. *(डिगरच्या उशीवर दोन पत्रं ठेवते.)* डिगर, हीं तुमचीं. एक—दोन.

**डिगर :** *(तीं उचलीत)* सिस्टर, खरोखर देवता आहांत तुम्ही!

**मार्गरेट :** *(टॉमीकडे जात)* टॉमी, हें तुमच्याकरतां एक 'ओबेस' पत्र. *(त्याच्या हातीं एक लठ्ठ पाकीट देते.)*

**यांक :** सिस्टर, मला एक द्या—तें देणेकऱ्याचं बिल असलं तरी चालेल—

**मार्गरेट :** *(त्याला एक देत)* घ्या.

**थांक** : *(पाहून)* हेंच हवं होतं! *(निवांतपणें वाचायला बसतो.)*

**मार्गरेट** : *(किविकडे जात)* कुणी तरी जीव लावून आहे तुमच्यावर, किवि. *(तीन पत्रं देते.)*

**किवि** : *(विजयानंदानें)* काय म्हणत होतों मी!

**मार्गरेट** : संपलीं. *(किविला)* पांघरूण नीट नाहीं वाटतं ठेवता येत तुम्हांला? *(दोघं मिळून तें नीट करतात. सगळे आपापलीं पत्रं वाचताहेत. लॅची बुटाला पॉलिश करतो आहे.)*

**टॉमी** : *(स्वतःशी, वाचीत)* आयूला! *(खिदळतो.)*

**मार्गरेट** : *(जायला निघते. मग वळून लॅचीकडे पहाते. त्याच्याकडे येते.)* तुमचीं पत्रं कुठं जातात, मला कळत नाहीं, लॅची. तुमच्या रेजिमेंटशींच तीं अडवत असले तर कोण जाणे. ए. बी. पी. ओ. ला लिहून एकदां विचारीत कां नाहीं तुम्ही त्यांना?

**लॅची** : मला पत्र येणं शक्य नाहीं.

**मार्गरेट** : तें कां? तुमच्या मित्रांना माहीत नाहीं तुम्ही कुठं आहां तें? कळवलं नाहीं तुम्ही त्यांना?

**लॅची** : तसे मित्र बरेच आहेत मला. फार काळजीपूर्वक निवडलेले—डून फूट, एरशायर, ग्लासगो, रोजमार्के, एडिन्बरो अशा ठिकाणीं रहाणारे लोक आहेत सारे. त्यांना माझे विचार चांगले माहीत आहेत आणि मला त्यांचे. पत्र लिहून ते एकमेकांना कळवण्याची आम्हांला जरुरी नसते.

**मार्गरेट** : पण घरची बातमी नाहीं म्हणून चुकल्याचुकल्यासारखं होत नाहीं तुम्हांला?

**लॅची** : *(तिच्याकडे वळत)* होतं. पण तुम्ही ऐकलं असेल—युद्ध चालू आहे सध्यां एक.

**मार्गरेट** : ऐकतें तें मी. ज्याच्याशीं लग्न करणार होतें मी, तो क्रेटमध्यें युद्धांतच मारला गेला. युद्ध चालू आहे असं ऐकलंय खरं मी.

**लॅची** : *(जरा वरमून बूट उचलीत)* म्हणजे तुम्हांला आहेच कल्पना.

**मार्गरेट** : आणि मला हेंहि कळतं कीं घरची बातमी कळली कीं तेवढंच मनाला बरं वाटतं.

**लॅची** : कळून उपयोग काय ? झालंय तें कांहीं त्यामुळें बदलत नाहीं.

**मार्गरेट** : बदलेलहि. *(पॉलिशचा ब्रश लची फडताळांत ठेवतो.)* हूं—टिफिन-साठीं आज विशेष कांहीं हवं आहे का तुम्हांला ?

**लॅची** : *(बुटाच्या वाद्या नीट करीत)* कांहीं नको.

**मार्गरेट** : असं कसं ? कांहीं ना कांहीं पदार्थ विशेष आवडीचा असेल तुमच्या. —मी स्वतः पुरवूं शकेन असा एकादा पदार्थ ?

**लॅची** : *(वळत)* कां ?

**मार्गरेट** : कां म्हणून कां विचारलंत ?

**लॅची** : कारण मला कळून चुकलंय, सिस्टर, तुम्ही माझ्याकरतां सारख्या कांहीं तरी विशेष करूं पहात असतां. यांतला तुमचा हेतु मला तेवढासा उमगलेला नाहीं, पण आधींच बजावून ठेवतों—पुढल्या आयुष्याबद्दलच्या माझ्या एकंदर योजनांत विवाहाला स्थान नाहीं.

**मार्गरेट** : फार उपकार झाले, सांगितलंत तें !

**लॅची** : हूं.

**मार्गरेट** : पण मीहि सांगून टाकतें, तुम्हांला लग्नाच्या जाळ्यांत पकडण्याचं माझ्याही मनांत नाहीं.

**लॅची** : असलं तरी आयुष्यांत ही माझ्यावर असली पहिलीच वेळ नव्हे. *(बूट उचलून वादी नीट करूं लागतो.)*

**मार्गरेट** : मला कल्पना आहे, फार पोरी मागं लागत असतील तुमच्या. तुमच्यासाठीं जीव कुर्बान करूं पहात असतील. मी विचारलं तें एवढ्याच दृष्टीनं कीं नेहमींच्या त्याच त्या जेवणांत आज जरा रुचिपालट घडला तर आवडेल तुम्हांला.

**लॅची** : मीहि पुन्हा सांगतों कीं माझ्याकरतां कुणी कांहीं करणं मला आवडत नाहीं. मला सवलती नकोत.

**मार्गरेट** : पण अधून मधून प्रत्येकाला सवलत मिळावी—हक्कानं मिळावी—आणखी कशाकरतां नव्हे तरी नियम मोडल्याच्या समाधानाकरतां.

**लॅची** : हक्कानं सवलत मिळायची असेल तेव्हां मी ती मागणार नाहीं—घेईन.

**मार्गरेट** : एकेकदां भारी अतिरेकी वागतां तुम्ही.

**टॉमी** : हिअर हिअर!

**लॅंची** : *(मार्गरेटला)* आणि माझ्याबद्दलच्या दयेनं तुम्ही माझ्याकरतां कांहीं करूं पहात असाल, तर अद्याप माझी ओळख पटली नाहीं तुम्हांला. मी फार वाईट माणूस आहें.

**मार्गरेट** : पुरे. समजलं.

**लॅंची** : तुमच्या मनासारखा हळवा माणूस मला बनता यायचं नाहीं. पण नाइलाज आहे माझा.

**मार्गरेट** : माझाहि नाइलाजच आहे. हळवेपणा आवडतो मला, तोच समजतो मला. *(रागारागानें तिच्या ऑफिसांत निघून जाते. स्वतःवर लागलीच ताबा मिळवून मागें परतते. दरम्यान लॅंचीनें बुटांची निगा पूर्ण केली आहे. कॉटच्या पायथ्याशी खालच्या बाजूला तो ते ठेवतो. तिथेंच उभा.)* घडल त्याचं वाईट वाटतं मला.

**लॅंची** : बाईच्या रागाकडे कधीं लक्ष देत नसतों मी. *(उशी नीटनेटकी करतो.)*

**मार्गरेट** : कधीं लग्न केलंतच तुम्ही तर उपयोगीं पडेल ही गोष्ट तुमच्या.

**लॅंची** : लग्नाचा विषय पुन्हा काढताहांत तुम्ही.

**मार्गरेट** : कृपा करून विश्वास ठेवाल का माझ्यावर? मला तुमची अगदीं इच्छा नाहीं. तुमच्याबद्दल कोणतंहि आकर्षण मला वाटत नाहीं. वाटलं तरी यापुढें मी तें अगदीं कठोरपणें निपटून काढीन. बस्स? आतां झालं? व्हा एकदाचे निश्चिन्त.

**लॅंची** : तरीहि तेंच. सारं नाकारण्याचा खटकणारा अट्टाहास.

**मार्गरेट** : कसलाच अट्टाहास नाहीं दाखवलेला मीं—आतां कसं सांगूं तुम्हाला! *(दीर्घ श्वास सोडून)* हें पहा, तुमच्यासाठीं तुमच्या आवडीचा एकाद विशेष पदार्थ करूं का, एवढंच विचारतें आहे मी. यांत लगट नाहीं आणि उपकारांचाहि प्रश्न नाहीं.

**लॅंची** : सध्यां मिळतं यांत मी सुखी आहें. *(कॉटवर आडवा.)*

**मार्गरेट** : तुम्हीच कांहीं तरी मागाल केव्हां तरी. मागाल तेव्हां तें कांहींतरी तसंच मोठं असेल एवढं पहा म्हणजे झालं. *(जातांना)* यांक, पत्र कसं काय आहे!

**यांक** : उत्तम. *(ती ऑफिसांत जाते. डिगर त्याला मिळालेलं दुसरं पत्र फोडून वाचूं लागतो.)*

**डिगर** : *(एकदम)* बाप झालों!—मी बाप झालों !

**यांक** : प्रगति आहे.

**टॉमी** : त्रास झाला का रे तुला फार?

**किवि** : बाबा कीं बेबी?

**डिगर** : बाबा! पोरगा झाला पोरगा, मला! वंशदीपक! माझंच नांव ठेवलंय त्याला! *(आनंदातिशयानें मोहरा फिरवून उलट बसतो आणि गाणं गुणगुणूं लागतो.)*

**यांक** : बाळबाळंतीण सुखरूप ना रे?

**डिगर** : अगदीं! विझार्ड!

**किवि** : काँग्रॅच्युलेशन्स, डिगर.

**टॉमी** : मला एकादं बाळ व्हायला हवं होतं. मग निदान दयेनं तरी मला रजेवर घरीं पाठवल्यांनीं असतं. चार वर्षं घर बघितलं नाहीं मी.

**यांक** : *(मागें रेलत)* पुढें काय लिहिते माझी लाडकी, पाहूं या. *(सगळे आपापलं पत्र वाचूं लागतात आणि पत्रांतल्या कशानं तरी टॉमी खिदळूं लागतो.)*

**टॉमी** : अरे बाबा माझ्या! हें जरा ऐकाच, मंडळी—

**यांक** : हं, ऐकव.

**किवि** : ऐकतों आहों आम्ही.

**टामी** : *(हंसून थकल्यावर)* माझ्या बायकोनं साऱ्या गांवाला मी रणांगणावर जांया झाल्याबद्दल सांगितलं आणि—*(पोट दुखेस्तोंवर हंसतो.)* काय केलं असेल सगळ्यांनीं?

**यांक** : काय केलं? पुतळा उभारला तुझा?

**टॉमी** : *(कसाबसा)* माझ्या सन्मानार्थ जेवण घातलं, जेवण. आणि एका पुडिंगला माझं नांव दिलं आहे! *(टोलेजंग हंसतो.)* पुडिंगला!—

**डिगर** : शंकाच नको. मोठं जड पुडिंग असलं पाहिजे तें!

**टॉमी** : म्हणजे बेदाण्यांनीं जडवून अमर केलं मला त्यांनीं! महामूर्ख लेकाचे! *(हंसणं ओसरत जवळ जवळ थांबतं आणि पुन्हा प्रचंड स्फोट होतो.)* दि पर्सिव्हल हॉकिन्स पफ्ड व्हीट पुडिंग—हा हा हा—हाः हाः हाः—

*(लॅची सोडून सार हंसताहेत.)*

**लॅची :** *(गंभीरपणें उठून चालू लागत)* तुम्हां लोकांच्या बायका मोठ्या नमुनेदार असल्या पाहिजेत.

**यांक :** आहेतच. कां ? काय झालं आतां ?

**लॅची :** मोठा अभिमान वाटत असेल तुम्हांला त्यांचा ?

**यांक :** वाटतोच.

**लॅची :** नंतर सावकाशीनं सांगितल्या तरी चालतील अशा शिळोप्याच्या अरबट चरबट गोष्टी कळवण्यासाठीं कागदांचा काय हा नास ! नुसतीं टपालाचीं तिकिटं वांचवलीं तरी त्यांत कित्येक माणसांचा निर्वाह कित्येक दिवस चालेल ! असल्या उथळ बुद्धीच्या उतावळ्या बायकांच्या पत्रांची ने-आण करण्यांत किती बोटींची आणि विमानांची वाहतूक खर्चीं पडत असेल, कल्पना आहे तुम्हांला ?

**डिगर :** मग मी म्हणतों, तुम्हीच कां नाहीं कांहीं दिवस या जगाचा कारभार हातीं घेऊन ईश्वराला रजा देत ? मनासारखं चालवा एकदां सारं !

**लॅची :** गुन्हा ठरावा एवढी उधळपट्टी चालवली आहे तुम्हीं लोकांनीं. *(सर्वांवर नजर रोखून)* आणि मजेंत आहांत सारे तुस्त बोक्यांसारखे !

**यांक :** आतां जरा कृपा करा आणि आमचे गुन्हे आम्हांला निवांतपणें करूं द्यात. कळलं ? नका त्रास देऊं.

**लॅची :** मी कोण त्रास देणार ? त्रास देणार तुमचीं मनं. तिथं आहे ना गुन्ह्याचा सल. *(बॅगपाइप काढण्याकरतां कॉटच्या उशाकडे जातो.)*

**यांक :** बरं बरं. असूं दे. *(लची बॅगपाइप काढून कॉटवर बसून तो वाजवायला सज्ज होतो.)* परमेश्वरा, याला दमा जडूं दे ! *(यांक पत्र बाजूला टाकतो. लची बॅगपाइप वाजवूं लागणार तवढ्यांत मार्गरेट येते. त्याच्या जवळ जाते.)*

**मार्गरेट :** लॅची, कर्नलचा निरोप आला आहे कीं त्यांना तुमची लागलींच भेट घ्यायची आहे.

**लॅची :** *(पाइप खुंटीला लटकवतो. मार्गरेटनें त्याचा बाथरोब फडताळांतून काढला आहे.)* तोच कां नाहीं आला इथं ?

**मार्गरेट :** *(त्याच्यापुढें जाऊन बाथरोब पुढें धरीत)* एक्स—रे घ्यायचा असावा त्यांना तुमचा. व्हील चेअर हवी का तुम्हांला ?

**लॅची** : नको. पाय आहेत मला. आणि त्यांत जोरहि आहे. *(बाथरोब अंगावर चढवतो.)* त्या कर्नलबद्दल आदर मात्र बिलकुल नाहीं माझ्या मनांत. खरं तें सांगतों.

**मार्गरेट** : आदर असायला हवा. ते केवळ चांगले वरिष्ठ अधिकारीच नाहींत, मोठे सर्जन आहेत.

**लॅची** : माझ्याबद्दल डूख आहे त्याच्या मनांत. *(रोबची नाडी बांधतो आहे.)*

**मार्गरेट** : कांहींतरीच.

**लॅची** : तरीहि माझ्याबद्दल त्यांच्या मनांत डूख आहे हें खरंच. *(दाराकडे जात)* आधींच तब्येत उत्तम आहे माझी. त्यांत मी स्कॉट्समन. कुणाला न मानवणारा. कर्नलसारख्या इंग्लिशमनला असली माणसं मानवणार कशीं ? *(निघून जातो. मार्गरेट त्याच्या रिकाम्या कॉटकडे येऊन उशी ठाकठीक करते आहे.)*

**यांक** : सिस्टर, हा खरोखर मरणार आहे का ? कारण, नसेल मरणार तर मी मारणार आहें त्याला.

**मार्गरेट** : काय भयंकर बोलतां ! शरम वाटते मला तुमची.

**किवि** : तुमचं ठीक आहे, सिस्टर. तुम्हांला थोडंच रहावं लागतं त्याच्याबरोबर !

**डिगर** : साऱ्या जगाबद्दल लेकाच्याला डूख.

**यांक** : याहून विषारी सर्प बरा. याला नुसतं बोट लावायची सोय नाहीं.

**मार्गरेट** : त्याला समजून घेण्याचा प्रयत्न केला आहे तुमच्यापैकीं कोणी ?

**यांक** : त्याला समजून घेणं म्हणजे त्याचा जास्त तिटकारा येणं.

**मार्गरेट** : त्याची चांगली बाजू पहाण्याचा प्रयत्न कां करीत नाहीं तुम्ही ? प्रत्येकाला एक चांगली बाजू असते.

**टॉमी** : अहो पण सिस्टर, त्याला आमची चांगली बाजू नांवालाहि दिसत नाहीं त्याचं काय ? महा खडुस माणूस तो.

**मार्गरेट** : म्हणून कांहीं त्याच्याशीं तुम्ही तसंच वागावं असं नव्हे. इकडे पहा. त्या मुलाला इकडं पाठवण्यांत आलं तें तुमच्या सुखासाठीं नव्हे. त्याला तुमच्या मदतीची जरुरी होती म्हणून. वास्तविक तुमचा यांत गौरव होता.

**यांक** : किंवा आम्हांला तें आव्हान होतं असं म्हणूं.

**मार्गरेट** : हरकत नाहीं—आव्हान होतं. आव्हान मिळालं असतां कच खाणं हा कांहीं पुरुषार्थ नव्हे. माझाहि तोल सुटतो—कबूल करतें मी. पण म्हणून प्रयत्न सोडता कामा नयेत.

**डिगर** : तो कधीं सुखी झाला तर त्याची मोठी पंचाईत होईल, सिस्टर.

**यांक** : लेकाच्यांत कुणाला बरं वाटेल असा एक तरी गुण असायचा होता.

**मार्गरेट** : *(त्याच्याकडे जात)* तुम्हांला तो आवडतो कीं नावडतो हा प्रश्न नाहीं. तसाच तो विशेष कोणी आहे कीं नाहीं हाहि प्रश्न महत्त्वाचा नव्हे. तो एक माणूस आहे हें महत्त्वाचं. आणि एका चमत्कारिक अवस्थेंतला माणूस. तुम्ही—तुम्ही सारे बरे व्हाल. पण त्याचं काय ? केला आहांत याचा विचार तुम्ही ?

**टॉमी** : पण तो कोणाला त्याच्याशीं चांगलं वागूंच देत नाहीं.

**मार्गरेट** : *(टॉमी आणि डिगर यांच्या कॉट्सच्या दरम्यान येत)* त्याचीं मतं आपल्यापेक्षां वेगळीं आहेत. म्हणून काय शत्रू होतो तो आपला !

**टॉमी** : पण त्याच्याशीं बोलणं कठीण होऊन बसतं ना.

**मार्गरेट** : यांच्या सहवासांत आपल्या आयुष्याचे अखेरचे दिवस आपण सुखानं घालवले, हें समाधान एकाद्याला देण्याची संधि कांहीं वारंवार मिळत नाहीं. खरंच, मला तुमची लाज वाटते !

**टॉमी** : फार फार नालायक आहोंत आम्ही, सिस्टर. माझंच पहा—शार्पनेल लागून लागावा तो कुठं ? *(डिगर टारगट हंसतो. मार्गरेटलाही मनाविरुद्ध किंचित् हंसूं फुटतं.)*

**मार्गरेट** : पहा—आज झाल्या गोष्टीची भरपाई करण्याची संधि आहे तुम्हांला. *(यांककडे वळत)* यांक, माझ्या ऑफिसांत जा—तिथं एक मोठं पुडकं आहे. तें या बरं घेऊन. *(यांक जाऊं लागतो.)* आज त्याचा वाढदिवस आहे.

**किवि** : त्याचा वाढदिवस ? *(यांक दाराशीं थबकलेला.)*

**मार्गरेट** : त्यांच्या 'ॲडमिटन्स कार्डा' वरून कळलं मला.

**डिगर** : मग काय आम्हीं त्याला वाढदिवसाची मेजवानी द्यावी कीं काय !

**मार्गरेट** : मदत करावी. चांगलं वागावं त्याच्याशीं.

**यांक** : बराय्. आणखी एक प्रयत्न आम्ही करून पाहूं. *(ऑफिसांत जातो.)*

**टॉमी** : त्याच्याकरतां वाढदिवसाचा केक आणला आहांत वाटतं तुम्ही, सिस्टर ?

**मार्गरेट** : नाहीं.

**टॉमी** : मग ? कांहीं तरी प्रेझेंट दिसतंय. *(यांक एक खोका घेऊन येतो आणि लॅचीच्या कॉटच्या पायथ्याशीं तो ठेवतो. मार्गरेट लॅचीच्या कॉटवर टेकते.)* आपल्याला बुवा प्रेझेंट्स आवडतात !

**मार्गरेट** : 'किल्ट' आहे या खोक्यांत.

**किवि** : किल्ट !

**मार्गरेट** : *(खोक्याची फीत सोडीत)* आणि त्याबरोबरचं सर्व कांहीं. त्याच्या रेजिमेंटकडे चौकशी करून मग कलकत्त्याला ऑर्डर दिली मीं. *(डिगर यांकच्या कॉटशीं येऊन उभा.)* वेळेवर येऊन पोंचली तें फार बरं झालं. आर. ए. एफ. मुळं हें शक्य झालं.

**यांक** : जरा—जरा थांबा ! याचा खर्च काय सगळा तुम्ही सोसणार ?

**मार्गरेट** : हो. पण माझी इच्छा आहे कीं हें प्रेझेंट तुम्हीं सर्वांनीं मिळून त्याला द्यावं.

**यांक** : हॅ ! आम्हीं त्याला हें द्यायचं तर याचा खर्च आम्हीच सोसणार !

**किवि** : आपण वर्गणी काढूं या—

**डिगर** : बिल असेल ना तुमच्याकडे ? त्यांतला तपशील पाहून एकेक कलम आम्ही वांटून घेऊं. बिल देतां का आम्हांला ?

**मार्गरेट** : हो हो. देतें. *(देते.)*

**टॉमी** : आतां यानं बेट्याला बरं वाटलं नाहीं तर कशानंच बरं वाटणार नाहीं.

**मार्गरेट** : हें पहा, कुणी कसला खर्च सोसायचा त्याची वांटणी नंतर करून घेऊं आपण. आतां आपल्याला घाई करायला हवी. एकेक वस्तु घ्या एकेकानं यांतली. *(डिगरला बूट देते.)* डिगर, हें तुमचं प्रेझेंट. उशीखालीं नाहीं तर कुठं तरी लपवून ठेवा.

**डिगर** : *(घेऊन स्वतःच्या कॉटकडे येत)* मलाच खरं तर असले हवे होते. *(उशीखालीं ठेवतो.)*

**टॉमी** : *(यांककडे बिल देत)* सिस्टर, मी त्याला पट्टा देतों. कसं ?

**यांक** : उत्तम. घे. *(मार्गरेटकडून घेऊन टॉमीला पट्टा देतो.)*

**मार्गरेट** : किवि, तुम्हांला यांतलं काय प्रेझेंट द्यायला आवडेल लॅचीला?

**किवि** : मी काय सांगणार, सिस्टर. तुम्हीच निवडा.

**मार्गरेट** : तर मग हे स्पॅट्स, स्टॉकिंग्ज आणि सपोर्टर्स घ्या तुमच्याकडे.

**किवि** : चालेल. *(मार्गरेटकडून घेतो.)*

**यांक** : मी त्याला जॅकेट आणि किल्ट देईन. कुणाचा विरोध नाहीं ना याला? नाहींतरी आपणा सर्वांत माझाच त्याच्यावर जास्त राग आहे!

**मार्गरेट** : हें चागलं होईल. घ्या. *(ती किल्टचा घागरा उचलून सर्वांना दिसेल असं धरते.)*

**किवि** : *(शीळ वाजवून)* आह्—लव्हली!

**डिगर** : विझार्ड!

**टॉमी** : इट्स् ग्रँड—इट ईज!

**यांक** : बरं आहे. पण होईल ना त्याला?

**मार्गरेट** : बरोबर मापाचं आहे. ती काळजी मीं घेतली आहे. *(यांककडे देते. तो तें ब्लँकेटखालीं ठेवतो. त्याबरोबर जॅकेटहि ठेवतो. मार्गरेट 'साइड-कॅप' उचलते.)*

**किवि** : सिस्टर, ब्लॉसमचं काय? तो आहे कीं नाहीं आपल्यांत?

**यांक** : हो तर. ब्लॉसमला त्याला साइड—कॅप देऊं द्या.

**किवि** : शुअर.

**टॉमी** : राइट—ओ.

**मार्गरेट** : *(ब्लॉसमला 'कॅप' नेऊन देते.)* हं, ब्लॉसम. *(ब्लॉसम ती घेऊन उजळतो. ती स्वतःच्या डोक्यावर उलटी ठेवतो. रिबिन त्याच्या डोळ्यांवर लोंबते.)*

**टॉमी** : झालं! संपलं! वाट लागली! आतां याच्याकडून ही परत मिळणं कठीण! आवडलीय याला!

**डिगर** : आणि त्यांतच आतां लॅची यावा! *(नजर ठेवण्याकरतां गडबडीनें बाहेरच्या दाराशीं जाऊन उभा. मार्गरेट ब्लॉसमकडे जाऊन कॅप परत घेते—किंचित्काल दोघांत हिसकाहिसकी. मग मार्गरेटच्या हातीं कॅप.)*

**मार्गरेट :** अंहं—नव्हे नव्हे—त्याला. *(लॅचाची रिकामी कॉट दर्शवते.)* त्याला. भेट म्हणून. *(र्हिंग्याचा मग आविर्भाव करून दाखवते. मग किविला)* माझं मलाच वेड्यागत वाटूं लागतं ! *('कॅप' खालीं ठेवून ब्लॉसमला बसायला खुणावते.)* लॅचीला सगळं देईपर्यंत असूं दे ही माझ्याचजवळ. *(पुन्हा खोक्यांत हात घालून 'स्पोरॅन' पेटीबाहेर काढते.)* आणि ही माझी भेट. स्पोरॅन. *(किविला दाखवते.)* संपलं सगळं.

**यांक :** बस्स ? कांहीं तरी महत्त्वाचं विसरलांत तर नाहींत ?

**मार्गरेट :** नाहीं, मला नाहीं वाटत. *(बोटं मोजते.)*

**यांक :** अहो 'किल्ट' खालीं—आंत ?

**टॉमी :** येडाच आहेस ! एवढं नाहीं माहीत ? *(त्याला जवळ बोलावतो. दोघांची कुजबुज. टॉमी हातानं वर्तुळ काढतो. मग तें उचलल्याचा अभिनय. मग 'कांहीं नाहीं' अर्थी हाताचा आविर्भाव. यांक 'आ' वासून बसलेला.)*

**यांक :** खरं म्हणतोस ?

**टॉमी :** मग काय तर !

**डिगर :** खटकतं खरं.

**मार्गरेट :** *(खोक्यांत पाहून)* खोक्यांत तर आणखी कांहीं नाहीं.

**किवि :** विसरले तर नसतील ते लोक पाठवतांना ?

**यांक :** *(खोका पहात)* कांहीं खरं नव्हे बुवा. हें म्हणजे कमालच झाली. अश्लील !

**टॉमी :** अश्लील नव्हे—कद्रू.

**डिगर :** हॅ ! कांहीं तरी आंतमध्यें वापरतच असतील. निदान साधी चड्डी तरी !

**किवि :** पैज ? कांहीं वापरत नसतील.

**यांक :** *(किविला)* पैज. दोन पौंडांची.

**किवि :** *(लगबगीनें गुडघे मोडून बसत)* ठरली. अखेर मिळाली एक तरी पैज मारायला !

**डिगर :** मी म्हणतों, यांक म्हणतो तेंच खरं ठरणार. माझे दोन पौंड.

**टॉमी :** मी म्हणतों तूं न् यांक, दोघेहि खोटे ठरणार.

**डिगर :** मार पैज.

**किवि** : *(खोक्यांतल्या दोऱ्या काढणाऱ्या मार्गरेटला)* सिस्टर, पैज ?

**मार्गरेट** : कसली ? चला, कांहींतरीच. वाह्यात नाहीं तर.

**किवि** : हा सामान्य ज्ञानांतला प्रश्न आहे, सिस्टर !

**मार्गरेट** : *नाहीं.*

**टॉमी** : *(डिगरला)* पहा तूं—आंत अगदीं चक्क नागडे असतात ! *(मार्गरेट खोका, स्पोर्रेन आणि कॅप उचलते. खोका यांकच्या उशीवर ठेवते. बाकी दोन वस्तू त्याच्या उशीखालीं लपवते.)*

**मार्गरेट** : आतां पुरे झाला हा विषय ! आपापल्या भेटी लपवून ठेवा. तो आला कीं त्याला द्यायच्या. *(टॉमी पट्टा उशीखालीं, किवि त्याच्याजवळच्या वस्तू 'बॅक रेस्ट' मागें लपवतो.)* दरम्यान आपण खाऊन घेऊं या. यांक—स्वैंपाकाच्या टेबलावर ट्रे आहे.

**यांक** : *(उठून जात)* कोल्ड बुली—बीफ, ब्रेड आणि जेली. *(जातो.)*

**किवि** : हेंच खायला असणार कीं नाहीं याबद्दल मारतं आहे पैज कोणी ? दोन रुपयांची पैज !

**मार्गरेट** : तेवढंच सध्यां आपल्याला शक्य आहे.

**टॉमी** : सिस्टर, त्याला पट्टा द्यायला मला उठायला पाहिजे ?

**मार्गरेट** : तर मग काय पट्टा भिरकावणार त्याच्या अंगावर ?

**किवि** : त्याचं खाऊन संपेपर्यंत वाट पहायची का, सिस्टर ?

**मार्गरेट** : नाहीं. आल्याबरोबर द्यायचं सगळं त्याला.

**यांक** : *(सहा भरलेल्या डिशेसचा ट्रे घेऊन येतो. डिगरपाशी, टॉमीपाशीं, किविपाशी यांतली एकेक डिश तो ठेवीत जातो. ब्लासम उभा राहून आपल्या वांट्याची डिश स्वीकारतो. कपाटावर यांक ट्रे ठेवून देतो आणि स्वतःची डिश घेऊन आपल्या कॉटकडे येतो.)* सिस्टर, माझ्या डोक्यांत आतां एक असं आलं कीं त्यानं प्रेझेंट्स घ्यायचींच नाकारली तर काय करायचं आपण ?

**किवि** : होय, सिस्टर—आठवतं का तुम्हांला, कुणाचं ऋण नको, कुणी आपल्यासाठीं कांहीं केलेलं आपल्याला आवडत नाहीं, म्हणून म्हणाला होता तो.

**मार्गरेट** : मला नाहीं वाटत प्रेझेंट्स नाकारील तो. आज त्याला तें शक्य होणार नाहीं. आज वाढदिवस आहे त्याचा.

**टामी** : पहा, भरवशाचा नव्हे ता.

**यांक** : *(खाऊं लागत)* सिस्टर, मी अशी प्रतिज्ञा करतों कीं त्यानं आपण दिलेलीं प्रेझेंट्स परत आपल्या अंगावर उडवलीं, तर त्याचा तो बॅगपाइप घेऊन त्यानं मी त्याला मरेस्तोंवर मारीन! *(सगळेच खाऊं लागतात.)*

**मार्गरेट** : तो तसं करणार नाहीं. असा विचार आपल्या मनांत येणंहि वेडेपणाचं आहे. आणि तरीहि—समजा, त्यानं नाकारलीं प्रेझेंट्स, तर त्याला तो हक्क आहेच.

**यांक** : म्हणजे तो प्रेझेंट्स स्वीकारील याबद्दल तुम्हांलाहि खात्री नाहींच, सिस्टर!

**डिगर** : *(दरवाजावर नजर)* अरे हळू—तो येतोय. *(स्वतः खात रहातो. यांक आणि डिगरला टॉमी खालील हकीकत ऐकवूं लागतो आणि ते, जणुं एकाग्रतेनें, ती ऐकत रहातात.)*

**टॉमी** : *(लॅची येईस्तोंवर दारावर नजर लावून)* आणि—बरं का—बकिंगहॅम पॅलेसमधलं नळाचं काम करायला मी होतों. म्हणजे रॉयल इंजिनिअरांकडे मी होतों तेव्हांची गोष्ट—*(लॅची प्रवेश करतो आणि सीधा त्याच्या कॉटकडे जातो. कांहीं बोलत नाहीं. त्याच्या वांटणीचं डिश पहातो आणि तें उचलतो. खायला बसतो कॉटवर.)* आणि हाऽ पाऊस पडत होता. सारखा पाऊस पडत होता. काम करणं कठीण! अखेर खुद्द राजा माझ्याकडे येऊन म्हणाला, "काय हो, टोपी कुठं आहे तुमची?" मी म्हणालों, "युअर रॉयल हायनेस, कंपनीनं टोपी पुरवलेली नाहीं मला." त्यावर लागलींच राजेसाहेबांनीं आपला हा पुढं केला—हा—मुकुट! म्हणाले, घ्या. ठेवा डोक्यावर. असूं द्या. म्हणजे डोळ्यांत पावसाचं पाणी जाणार नाहीं तुमच्या." *(किरटा हंसतो. खाऊं लागतो. लॅचीचं इकडे दुलक्ष. तो खातोच आहे.)*

**डिगर** : *(विषादानें खांदे उडवून)* हूं. दोन वर्षे वयाची आत्या असणाऱ्या माणसाकडून यापेक्षां काय आणखी ऐकायला मिळणार! *(मार्गरेटची डिगरला खूण. प्रथम त्याचं प्रेझेंट लॅचीला द्यायला सुचवते. डिगर डिश खाली ठेवतो. आणि बूट बाहेर काढतो. लॅचीच्या कॉटकडे जातो आणि त्याच्या शेजारी बूट ठेवतो.)* तुमचा वाढदिवस आहे असं ऐकलं. म्हटलं, हे उपयोगाला येतील तुमच्या. कॉंग्रॅच्युलेशन्स. *(क्षणभर थांबतो. लॅचीनं चमच्यांत उचललेला घांस तसाच धरला आहे. मग पुन्हा एकदां तो*

*हातांतल्या डिशबाहेर कुठं न पहाता खाऊं लागतो. डिगर घुटमळतो. कांहीं तरी उत्तर मिळेल म्हणून वाट पाहून अखेर आपल्या कॉटकडे परततो. लॅची डोकं किंचित् फिरवून नजरेच्या कोपऱ्यांतून ते बूट पाहून घेतो. पुन्हा शांतपणें रवंथ करीत रहातो. मार्गरेट टॉमीला खुणावतो. तो धडपडत कॉटवरून उठून खालीं उतरतो. पायांत स्लिपर्स चढवतो. लॅचीकडे येतो. हातांतला पट्टा बुटांशेजारीं ठेवतो.)*

**टॉमी :** मेड इन स्कॉटलंड—आहे त्यावर लिहिलेलं—हॅपी बर्थडे. *(लॅचीचा रवंथ निर्वेधपणें चालू. टॉमी निमिषभर वेळ काढतो आणि त्याच्या कॉटकडे परततो. मग मार्गरेटकडून किविला इशारा. तो निघतो. लॅचीपर्यंत पोंचतो.)*

**किवि :** बूट घालायचे तर स्टॉकिंग्ज हवेत. नाहींतर पायाला भोवऱ्या होतात. स्टॉकिंग्ज वापरायचे तर सपोर्टर्स हवेत. एरवीं मान मोडेल. दि बेस्ट ऑफ लक टु यू. *(वांकून हातांतल्या वस्तू अच्चळ लॅचिच्या कॉटवर टाकतो. उत्तराची वाट पहात नाहीं. मार्गरेट आतां कॅप ब्लॉसमकडे नेते. त्याच्या हातांत ती ठेवते. लॅचीजवळ त्यानें ती नेऊन ठेवावी म्हणून खुणावते. ब्लॉसम होकारार्थी मुंडी हलवून सूचनेबरहुकूम वागतो. हातांतली कॅप इतर वस्तूंवर ठेवतांना वांकड्या मानेनें लॅचीला एकदां न्यहाळून घेतो. तसाच उभा रहातो. मार्गरेट जोरजोरानें हातवारे करून त्याला त्याच्या जागी परतण्याला खुणावते. अखेर तो त्याच्या जागीं परततो. त्यानंतर ती स्वतः स्पोरॅन द्यायला जाते.)*

**मार्गरेट :** लॅची, कांहीं राहिलं असेल आमच्या हातून तर मानायचं नाहीं बरं का. *(स्पोरॅन त्याच्याजवळ ठेवून)* बरंच जमलं आहे कीं तुमच्याकडे एवढ्यांत. *(परततांना यांकला खूण करते. लॅची अद्याप मख्ख आहे. यांक उठतो, जकट आणि किल्ट घेऊन लॅचीकडे जातो. सारे खाणं थांबवून उत्सुकतेनें पहाताहेत.)*

**यांक :** ऑल द बेस्ट टु यू, लॅची. *(प्रथम जॅकेट ठेवतो. त्यावर किल्ट पसरतो. लॅची निःस्तब्ध आहे. बोलत नाहीं, पहात नाहीं. यांक त्याच्या कॉटकडे परततो. मार्गरेट टॉमीकडे जाऊन त्याला कांहीं तरी कानांत सांगते. टॉमी घसा खांकरून गाऊं लागतो.)*

**टॉमी :** 'ॲपी बर्थडे टु यू
'ॲपी बर्थडे टु यू—

*(मार्गरेट आणि इतर यांत आपले सूर मिसळतात. ब्लॉसम यांतला 'उत्सव' उमजून त्याच्या मुलुखांतल्या पद्धतीप्रमाणें, लॅचीसमोरच, आपल्या दोन्ही कुशीत फडाफड मारून घेत ताल धरतो.)*

हॅपी बर्थडे, डिअर लॅचलेन,

हॅपी बर्थडे टु यू.

*(हें संपतं. लॅची गप्पच. शांतता. एकमेकांकडे कांहींसे वरमून पहातात.)*

**यांक** : जेनेसिस, एक्सोडस, लेव्हिटिकस, नम्बर्स...*(मार्गरेट त्याला खांद्यावर हात ठेवून गप्प करते. यांक थांबतो, कारण लॅची जागचा उठला आहे. लॅची घसा खांकरतो.)*

**लॅची** : याबाबत चार शब्द बोलतों. *(आवंढा गिळतो.)* तुमचं हें मला कांहींच कळलं नाहीं. माझा मेंदू सुन्न झालाय या—तुमच्या—यानं. *(किल्टवर हात रोवतो.)* असं उगींचच्या उगींच मला कधींच कुणी कांहीं—छदाम देखील दिला नव्हता. तुम्ही आठवण केली नसतीत तर माझा हा आजचा वाढदिवस—हा मलाहि आज कळला नसता. पण...*(सर्वांना सामोरा येतो.)* हें तुम्हीं दिलेलं किल्ट घेण्याचा मला काय अधिकार ? घेतलं तर ऋण चढतं. आणि परतफेड करायला कांहींच नाहीं माझ्याकडे. *(किल्टकडे बेचैनपणें पहात)* मला अशी चूक करून चालणार नाहीं. म्हणतात कीं उतावळ्या मनांत दुःख रुजतं. मला दुःख नको आहे. तेव्हां माझा प्रश्न असा कीं...माझ्यापुढचा प्रश्न...

**मार्गरेट** : *(त्याच्याकडे जात)* पुरे, लॅची, पुरे. *(खिशांतून थर्मामीटर काढू लागते.*

**लॅची** : पण मला काय वाटतं तें सांगायलाच हवं मला. तर माझा...माझ्यापुढचा प्रश्न...

**मार्गरेट** : कांहीं सांगण्याची जरुरी नाहीं. आयुष्यांत एकदां तरी करा उतावीळ आणि पत्करा चुकण्याचा धोका.

**लॅची** : *(शिकस्तीनें बोलणं पुरं करूं पहात)* पण मी...मला...*(मार्गरेट थर्मामीटर त्याच्या तोंडांत सरकवते. त्याला गप्प व्हावंच लागतं.)*

**मार्गरेट** : तोंड गप्प ठेवून तुमचं मन जरा बोलूं द्या. स्कॉट माणूस स्वतःचा मामा करतो तोही मोठ्या थाटानं. *(त्याला हळूंच खाली बसवते. तो कॉटवर बसतो.)*

**टॉमी** : अखेर हे घेणार का तें सगळं, सिस्टर ?

**मार्गरेट** : अर्थात्. त्यांच्या मनांत तसंच होतं. लॅची, या सगळयांचे आभार मानण्यासाठीं चांगले शब्द तुम्ही शोधीत होतात, होय ना ? *(लॅची मान हलवतो 'होय ' म्हणून.)*

**यांक** : *(लॅचीला सामोरा येत)* आतां हा पोशाख चढवा ना !

**डिगर** : हो. पाहूं तरी कसे दिसतां ते.

**टॉमी** : आंत कांहीं असतं का पाहूं.

**यांक** : खरंच, लॅची, आम्ही एक पैज मारली आहे. आणि तिचं उत्तर तुमच्याकडे आहे.

**मार्गरेट** : तुम्हाला पैजेच्या पैशांशिवाय दिसतंय काय ?

**यांक** : किल्टच्या आंत तुम्ही कांहीं नेसतां कीं नाहीं नेसत ?

**लॅची** : *(थर्मामीटर तोंडाबाहेर काढीत)* मित्र हो, हा प्रश्न विचारलात तें फार वाईट केलंत—कारण मला तुम्हांला याचं उत्तर सांगता येत नाहीं. या प्रश्नाचं बरोबर उत्तर कोणीही अस्सल कुळीचा स्कॉट देत नसतो.

**यांक** : तर मग नाहीं सांगत तुम्ही ?

**लॅची** : माझ्या जातीशीं द्रोह करायला सांगाल तुम्ही मला ? *(मार्गरेट त्याच्याकडून थर्मामीटर घेते.)*

**यांक** : हरकत नाहीं—सध्यां कपडे तर चढवा.

**क्रिवि** : चढवा !

**डिगर** : हं, इण्टु युअर किल्ट !

**टॉमी** : घालाच तुम्ही ते कपडे !

**लॅची** : योग्य समय येईपर्यंत हे कपडे चढवण्याचा माझा मानस नाहीं.

**यांक** : *(पुढें वांकून)* काय म्हणालांत ?

**लॅची** : योग्य प्रसंगालाच हे कपडे मी घालीन. म्हणजे रेजिमेंटमध्यें पुन्हा हजर होईन तेव्हां. त्या आधीं नाहीं. *(सगळ्याच्या थट्टा करूं लागतो.)*

**यांक** : *(नाइलाजानें)*सिस्टर, यांना असं करूं देऊं नका.हे तर सगळे ठेवून देताहेत !

**लॅची :** तुम्ही मंडळींनीं हे मला, मला बरं वाटावं म्हणूनच दिलेत का कांहीं अटी आहेत ?

**मार्गरेट :** नाहीं—वाढदिवस आहे तुमचा—त्यांचं कांहींही करा तुम्ही.

**लॅची :** तर मग हे ठेवून देतों मी. *(मार्गरेट त्याच्यापुढें खोका करते. त्यांत तो तें सगळं भरतो.)* याबद्दल आभार. मी लौकरच्या काळांत विसरणार नाहीं हा दिवस. *(ब्लॉसम खिडकीबाहेर पहात उभा रहातो.)*

**यांक :** समारंभ संपला ?

**लॅची :** आणखी काय उरलंय ?

**यांक :** मला वाटतं, संपला. पर्फेक्ट स्कॉटिश बर्थडे पार्टी. *(लॅची खोक्याला झांकण लावतो आणि खोका कॉटखाली ढकलतो. यांक डोकं धरून त्याच्या कॉटवर बसलेला. लॅची आपल्या कॉटवर स्थानापन्न होऊन खाणं पुढें सुरू करतो.)*

**मार्गरेट :** आतां, इथून जायच्या पूर्वी माझ्याकडून कांहीं हवं आहे का तुम्हांला ?

**लॅची :** नको. मजेंत आहे मी.

**मार्गरेट :** उत्तम. *(तिच्या ऑफिसांत जाते. किवि उठून यांक आणि टॉमीच्या फडताळावरचं मासिक घेतो. यांकच्याच कॉटवर बसतो. वाचूं लागतो. लॅची खाणं संपवून डिश खालीं ठेवतो. इतरांकडे पहातो. मग ब्लॉसम-कडे त्याची नजर जाते—मग तो दाराशी जातो आणि बाहेर पहात रहातो. नंतर दार लावून घेऊन इतरांकडे पहातो. डिगर आणि टॉमीच्या दरम्यान येतो. खिडकीवाटें बाहेर पहातो. मग डिगरशी बोलतो.*

**लॅची :** त्या वडाच्या झाडांत एक अगदीं नवीन, विलक्षण पक्षी आहे. *(कांहीं अस्वस्थपणें दाखवतो. डिगर पडल्या जागीं कोपरावर टेकून बाहेर पहातो.)*

**डिगर :** हो—कावळा तो. *(लॅची पहातो तिकडे—मग डिगरकडे वळतो. क्षणभर चांचरून बाथरोबच्या खिशांतून सिगरेटी बाहेर काढतो.)*

**लॅची :** सिगरेट ?

**डिगर :** थँक्स.

**लॅची :** *(पाठमोऱ्या यांककडे जातो.)* सिगरेट हवी का? *(कांहीं न बोलतां यांक एक घेतो. त्याच्या मुद्रेवर नवल. खिशांतली काडेपेटी काढूं जातो परंतु लॅची तेवढ्यांत काडी ओढून त्याच्यापुढें धरतो. लॅची यांकच्या कॉटचं टोक दर्शवून)* इथं बसूं का मी? *(यांक होकार देतो. लॅची बसतो. पुढें वांकलेल्या यांककडे एकदां पहातो आणि मग इतरांकडे. यांक लचीकडे पाहूं जातो आणि त्याच्या मुद्रेवर स्मित येतं. यांक ताठ बसतो. लॅचीच्या पाठीला त्याची पाठ लागते. दोघांचा सिगरेट धरलेला हात एकदमच उंचावतो आणि दोघंही झुरका घेतात. यांक मंद हंसतो आहे लॅची मजेंत आहे. आणि पडदा पडतो.)*

## प्रवेश दुसरा

*[तेंच स्थळ. संध्याकाळ झाली आहे. पहिल्या दृश्यानंतर कांही दिवसां-नंतरचा काळ.*

*पडदा उघडतो तेव्हां एकाच उघड्या खिडकीवाटें उतरतं उन्ह आंत पसरलं आहे. बाकी खिडक्या बंद आहेत. डिगर वॉशरूमध्यें आहे टॉमी आपली आणि डिगरची मच्छरदाणी सोडतो. आपली मच्छरदाणी कॉटच्या चहूंबाजूंनीं गादीखालीं सरकवतो. अद्याप त्याच्या अंगावर दिवसाचे शुभ्र कपडेच आहेत.*

*ब्लॉसमनं रात्रीचे निळे कपडे चढवले आहेत तो आपली आणि किविची मच्छरदाणी सोडतो. उजवीकडचे तीन दिवे लावतो.*

*यांक शुभ्र कपड्यांत. मानेभोंवतीं टॉवेल. खिशांत टूथ ब्रश. मच्छर-दाणी सोडून कडेन गादींत खुपसतो. किवि आपल्या कॉटवर बसून आहे. लॅची त्याच्याजवळ उभा राहून त्याला कांहींतरी बरंच ऐकवतो आहे. किविचे कपडे शुभ्र आणि हातांत टुथ ब्रश.]*

**लॅची :** आणि तुला सांगायचं म्हणजे किवि, गृहाच्या एका गरीब बिचाऱ्या सदस्यानं पार्लमेंटकडे मागणी केली कीं म्हातारवयांतल्या पेन्शनमध्यें तीन पेन्स वाढ व्हावी. *(किवि उठूं पहातो त्याला बसवून)* आणि ही ऽ धमाल उडाली !

कुणाला वाटलं असतं—राजाच्या खजिन्यांतलीं रत्नंच फेकून द्यायचा आग्रह कुणी धरला आहे! *(पुन्हा किवि उठूं पहातो त्याला दडपून)* फक्त तीन पेन्सचा प्रश्न! एकेक बुजुर्ग जागचे उठले तडातडा—*(कसे तें हातानं दाखवतो. किवि याचा फायदा घेऊन उठूं पहातो.)* बुडाला विंचू डसावा, तसे!

**किवि** : असं का. वा. पण लॅची, मला वाटतं त्यापुढलं मी उद्यांच ऐकेन. नक्की ऐकेन. *(मागें मागें सरकत सुटतो. एकीकडे लॅचीच्या खांद्यावर चुचकारल्यागत थोपटतो आहे. लॅची त्याच्या बरोबर सरकतो.)*

**लॅची** : 'वाजवा दिवाळं साम्राज्याचं!' म्हणून हे सरकारपक्षाचे सिंह डरकाळले. कोणी विचारलं, "एवढे पैसे आणायचे कुठून?"

**किवि** : *(हातघाईला आल्यासारखा दिसतो. यांककडे निर्देश करून)* या—या यांकलाच कां नाहीं सांगत हें? खरं म्हणजे त्याला यांत माझ्यापेक्षां जास्त कळतं. *(लॅची याककडे मोर्चा वळवतो. किवि वॉशरूममध्यें पसार.)*

**लॅची** : *(यांक्ला गांठून)* तीन पेन्स. बस्स! इतका किरकोळ प्रश्न. त्यातहि गरिबांना मदत व्हावी हा हेतु. पण पंतप्रधान बजावतात, "चिपाडांतून अधिक रसाची अपेक्षा करण्यापैकीं होतं आहे हें!" *(ब्लॉसम आतां किविची मच्छरदाणी लावीत आहे.)*

**यांक** : *(मोठ्या प्रेमानें)* हें बघ—गड्या—गेला आठवडाभर सारखा बोलतोच आहेस तूं. आतां जरा तुझा बॅगपाइप कां वाजवीत नाहींस? *(लॅचीच्या खांद्यावर हातानं थोपटल्यासारखं करतो आहे मग मच्छरदाणी लावण्याचं काम पुढें चालू करतो.)*

**लॅची** : नाहीं, पण दानत पहा! युद्ध लढायचंय म्हणा कीं वाटेल तेवढे पैसे उभारतात हे लोक! तिथं पैसे कुठून आणायचे हा सवाल नाहीं.

**यांक** : *(वॉशरूमकडे जाऊं लागत)* मी जरा दांत घासून येतों तोंवर पार्लेमेंटचं काम तहकूब राहूं दे, हं?

**लॅची** : *(मागोमाग जात)* पार्लमेंट म्हणतं, गरिबांबद्दल आम्हांला कळवळा जरूर वाटतो, पण सरकारहि गरीबच आहे! आतां जरा ऐकून घे. ही सध्यांची लढाई लढवायला दिवशीं किती खर्च करतं सरकार, आहे का माहीत?

**टॉमी** : *(त्या बाजूला आलेला.)* भयंकर खर्च करीत असावं. *(याला उत्तर देण्याकरतां लॅची वळतो. तेवढ्यांत यांक वॉशरूममध्यें गडप.)*

**लॅची :** जवळ जवळ दहा लाखांहून अधिक पौंड. दहा लाख, विचार कर! *(पुन्हा मागे पहातो. यांक गेल्याचं त्याला कळतं. म्हणून तो टॉमीवर आक्रमण करतो.)* पैसे नाहींत तर मग हे एवढे येतात कुठून? कोण ही जादू करतं? *(टॉमीवर बोट रोखून)* अर्थशास्त्रज्ञ. इकॉनॉमिस्टस्.

**टॉमी :** कोण?

**लॅची :** इकॉनॉमिस्ट्स.

**टॉमी :** या युद्धांत आपल्या बाजूला आहेत का पण ते?

**लॅची :** *(होकार.)* एवढे पैसे हे लोक आणतात कुठून? हे पैसे छापतात!

**टॉमी :** *(वॉशरूमकडे जाऊं लागतो.)* मग आणखी थोडे छापून माझा पगार कां वाढवत नाहींत ते बेटे?

**लॅची :** *(मागोमाग जात)* कारण सोपं आहे. जेवढे जास्त छापावेत तेवढी पैशाची किंमत कमी होते. म्हणून माझं जरा ऐक. पैसे जमिनींत गुंतव. जमीन थोडीच कुणी छापणार आहे?

**टॉमी :** माझे मी माझ्या पोटांत गुंतवीन. बीअर! *(खिदळत वॉशरूममध्ये अदृश्य होतो. लॅची लटकलेला. तो आपल्या कॉटकडे परततो. ब्लॉसम त्याला दिसतो. ब्लॉसमला धरून मग तो त्याचं प्रवचन पाजूं लागतो. ब्लॉसम गागरलेला.)*

**लॅची :** रणांगणावर पाठवायचा प्रत्येक सैनिक शिकवून तयार करायचा तर किती खर्च येतो, आहे माहीत? माणशीं दहा हजार पौड! आतां यांतलीच निम्मी रक्कम जरी तुम्ही त्या माणसाला दिलीत तरी दोन मिनिटांत युद्ध थांबेल आणि राष्ट्रीय कर्ज झटक्यासरशीं निम्म्यावर येईल. आहांत कुठें?

**ब्लॉसम :** ब्लॉस्–सम! *(मार्गरेट येते. पहात थबकते. लॅची जागच्या हललेल्या ब्लॉसमला पुन्हा झडपतो.)*

**लॅची :** हें सगळं पाहिल्यावर सामान्य माणसानं काय शिकायचं, कसला बोध घ्यायचा, सांगा! असलं कसलं हें सरकार!

**मार्गरेट :** काय चाललंय तें कळेल का मला?

**लॅची :** माझ्या अनुभवाचा फायदा माझ्या इथल्या मित्रांना मी देतों आहे. *(स्वतःच्या कॉटकडे जातो आणि बसतो. ब्लॉसम वॉशरूमकडे अदृश्य.)*

**मार्गरेट :** उद्यांसाठीं शिल्लक ठेवा थोडा अनुभव. दहा मिनिटांत दिवे घालवणार आहे मी. *(त्याची मच्छरदाणी पाडते. लॅंची थकल्यासारखा दिसतो आहे हें तिच्या नजरेंत आलं आहे.)* आज कसं काय वाटतंय तुम्हांला ?

**लॅंची :** तुम्ही विचारतां म्हणजे नवल आहे.

**मारेर्गट :** काम आहे तें माझं.

**लॅंची :** पण माझी कल्पना होती कीं तुम्हांला न सांगतां समजेल सारं. आज अशक्त वाटतं आहे मला थोडं. हातांना जरासा घाम सुटतो आहे आणि पाय सुजावेत तसे वाटतात.

**मार्गरेट :** इथल्या इथं फार फिरतां तुम्ही. आणि फार बोलतां पण.

**लॅंची :** माणसानं फिरलं पाहिजे. आणि बोललं पण पाहिजे. माणूस म्हणजे भाजीपाला नव्हे कीं दगडधोंडा नव्हे.

**मार्गरेट :** पण थकलांत कीं झोंप लागत नाहीं तुम्हांला. आणि मग जास्तच थकतां तुम्ही—काल रात्रीं इथं आलें मी, तेव्हां झोंपेंत तळमळत होतांत तुम्ही; कण्हत होतांत.

**लॅंची :** कण्हत नव्हतों मी.

**मार्गरेट :** झोंप स्वस्थ नव्हती तुम्हांला, इतकं खरं.

**लॅंची :** मनांत जरा विचार होता माझ्या—डोक्याला स्वस्थता नव्हती.

**मार्गरेट :** कसली काळजी का लागली आहे तुम्हांला ?

**लॅंची :** हं.

**मार्गरेट :** माझ्याकडून होईल कांहीं मदत ?

**लॅंची :** *(तिच्याकडे न पहातां)* खरं म्हणजे माझ्यासारख्या खंबीर मनाच्या माणसाला आपण चुकलों असूं हें कबूल करणं जडच जातं. सिस्टर, तुम्ही समजतां तसा मी नाहीं.

**मार्गरेट :** *(हळूवारपणें)* मी तुम्हांला कसे समजतें तें नक्की माहीत आहे तुम्हांला ?

**लॅंची :** हो. मी हुशार आणि धोरणीहि वाटत असेन तुम्हांला. माझे सारे प्रश्न मला चांगले समजतात आणि माझा कधींच कुठल्या बाबतींत गोंधळ उडत नाहीं असं वाटत असेल तुम्हांला.

**मार्गरेट** : असे वाटतां तुम्ही मला ?

**लॅची** : *(तिच्याकडे पाहतो.)* हो. सांगू सिस्टर, ही माणसाची जात मला फारशी आवडत नव्हती. कोणत्याच माणसाबद्दल आदर नव्हता मला, प्रेम नव्हतं. माणसाच्या चांगुलपणावर विश्वास नव्हता माझा. आणि ही लढाई आली. त्यांतहि माझं मत सुधारलं नाहीं.

**मार्गरेट** : पण स्कॉटलंडमध्यें तुमचे बरेच मित्र असल्याचं सांगितलं होतंत तुम्ही मला—

**लॅची** : खोटं तें. कुठले असणार मित्र मला ? मला नव्हतं शिक्षण. त्यांत मी दरिद्री—अगदीं कंगाल. चैन-मजेंत खर्चायला पैसे नसत जवळ. कुणी जवळ यावं, रहावं असं कांहीं एक नव्हतं माझ्याकडे. सिस्टर, घ्यायचं तर कांहीं द्यायला हवं.

**मार्गरेट** : असंच काय म्हणून ?

**लॅची** : माणसाला त्याचा स्वाभिमान असतो ना. ताठा असतो.

**मार्गरेट** : लवचिकपणासुद्धां गुण ठरतो एकेकदां.

**लॅची** : *(लांब पहात)* पण त्यांत रग नसते. साऱ्या आयुष्यांत मी कुणाला आवडलों नाहीं आणि कुणी मला आवडलं नाहीं. आतां बदललोंय मी.

**मार्गरेट** : तुम्हांला बदलायला एक युद्ध घडावं लागलं, एवढंच वाईट झालं.

**लॅची** : हो. पण तेंच खरं आहे. *(वॉशरूमच्या बाजूनें टॉमीचं खिदळणं आणि डिगरचं त्याला दटावणं. लॅची उठून त्या दिशेनं पाहूं लागतो.)* कधींच मला उमजलं नाहीं कीं एकादा माणूस तुमच्याकडून कसली अपेक्षा न करता तुमचा मित्र बनतो, रहातो. आतां कळतंय, पण एकवीस वर्षे उशीर झालाय. *(चालूं लागत चढत्या सुरांत, अस्वस्थपणें)* कामांतला माझा वांटा उचलायला हवा मला.

**मार्गरेट** : *(मागोमाग जात)* हें पहा, तुम्हांला कांहीं तरी नवा शोध लागला आहे. त्याची किंमत घाईगर्दीनं चुकती करायला हवी असं उगींच समजूं नका.

**लॅची** : पण हा शोध पश्चात्तापासारखा आहे, सिस्टर. किती त्रास होतोय मला त्याचा, तें कसं सांगूं ? व्यापून राहलाय सारं मन. या वेळीं कामाची अत्यंत आवश्यकता आहे मला.

**मार्गरेट** : खूप वेळ आहे त्याकरतां. दिवे घालवले कीं गरम गरम कांहीं तरी प्यायला करून आणून देतें मी तुम्हांला—त्यानं सुरेख झोंप लागेल तुम्हांला.

**लॅंची** : तुम्हांला कशाला त्रास—

**मार्गरेट** : त्रास मुळींच नाहीं. यांकला तुमचं अंग चोळायला सांगतें. *(वॉशरूमकडे जाऊन)* यांक—मला जरा उशीर होईल. लॅंचीचं अंग जरा चोळाल का ?

**यांक** : *(वॉशरूममधून दबल्या सुरांत)* शुअर.

**मार्गरेट** : आणि खिडकी बंद करायला विसरूं नका. *(ऑफिसच्या दाराकडे जात)* लॅंची, कपडे बदलून पडा आतां. जग बदलण्याचे बेत करीत रात्र जागवता कामा नये आज. *(जाते. लॅंची कपडे बदलतो. क्षणभरांत टॉमी येतो.)*

**टॉमी** : *(येत)* आज रात्रीं आतां पुन्हां तीं भयंकर स्वप्नं न पडोत, बुवा. काल रात्रीं स्वप्न पडलं कीं, पोट एवढं मोठ झाल्यं माझं कीं माझ्यापुढं तें हातगाडी-वर घालून न्यावं लागतंय !

**लॅंची** : *(टॉमीकडे येत)* टॉमी, एक मिनिट जरा थोडं विचारूं का ?

**टॉमी** : हो हो. पूछिये जनाब.

**लॅंची** : उद्यां युद्ध संपल्यावर लष्करांतून बाहेर पडशील—तेव्हां एकादी नोकरी तयार असेल का तुझ्याकरतां ?

**टॉमी** : आमची नोकरी म्हणजे आमची बायको. तिच्या बापाचा गुत्ता आहे.

**लॅंची** : पण नात्याच्या माणसांकडे कामाला रहाणं खरं नव्हे. माझ्या डोक्यांत एक कल्पना आली. माझ्या मालकीची स्कॉटलंडमध्यें जमीन आहे थोडीशी. तिथं तूं थोडे दिवस येऊन विश्रांति घ्यायला कांहीं हरकत नाहीं. ओढायला मुबलक तबाखू, खायला भाकर, बसायला हक्काची धडकी खुर्ची आणि गप्पा मारायला सारा दिवस मोकळा.

**टॉमी** : थॅंक यू फॉर द ऑफर, लॅंची. पण बायकोपासून दूर जायचंच तर स्कॉटलंड-पेक्षांहि दूर जाव लागेल मला. *(कॉटकडे येतो. केरोसीनचा दिवा घालवतो.)*

**लॅंची** : *(त्याच्या कॉटकडे जात)* ठून फूट आवडेल बघ तुला.

**टॉमी** : खरं सांगायचं तर, एरवीं काय वाटेल तें बोलतों मी, पण माझी बायकोसुद्धां मला फार आवडते. सिली ओल्ड वॉश-टब !

**लॅंची** : म्हणजे हें कांहीं तरी सुचलं आणि मीं बोलून टाकलं असं नव्हे; तुझ्या हिताच्या दृष्टीनें फार विचार केल्यावर बोललों मी.

**टॉमी :** ठीक केलंस, पण मला बायकोकडे परत गेलं पाहिजे. *(मच्छरदाणींत शिरतो. यांक वाशरूममधून येतो. खिडकी बंद करून घेतो.)* आणि हें बघ, कधीं लंडनला आलास ना, तर माझ्या बायकोचं घर तुझंच आहे. गुड नाइट.

**लॅची :** गुडं नाइट. *(यांक लॅचीच्या कॉटलगतच्या फडताळाकडे येतो. अंग चोळण्याच्या अल्कोहोलची बाटली काढतो.)*

**यांक :** तुला काय वाटलं, विसरलों मीं तुला ?

**लॅची :** छे. *(लॅची त्याच्या कॉटकडे जातो, उशी घेतो आणि उपडा पडतो.)*

**यांक :** हां. हो चांगला लंबे.

**लॅची :** आज कां इतका गळलोंय मी, कांहीं कळत नाहीं.

**यांक :** जरा पडा बरं ऐसपैस. *(हातावर अल्कोहोल ओतून घेतो.)*

**लॅची :** यांक.

**यांक :** हूं ? *(अंग चोळूं लागतो.)*

**लॅची :** तुला असेलच माहीत म्हणा, स्कॉटलंडमध्यें एक छोटं घर आहे माझं. आहे साधंच, पण हक्काचं आहे. माझ्या डोक्यांत सहज एक कल्पना आली कीं युद्ध संपल्यावर तुला अमेरिकेशिवाय कुठं जायला ठिकाण नसलं तर खुशाल माझ्या घरीं येऊन लागेल तितके दिवस रहा.

**यांक :** थँक्स, दोस्त. पण ती वेळ येईल तेव्हां सीधा घरींच जाणार मी.

**लॅची :** तसंच कांहीं आहे वाटतं तिकडे, मन गुंतवण्याजोगं ?

**यांक :** हो तर. माझी बायको वाट पहाते आहे माझी.

**लॅची :** फार प्रेम करतां रे तुम्ही एकमेकांवर ?

**यांक :** प्रेम कीं काय तें मला माहीत नाहीं बुवा, पण जें कांहीं आहे तें आमच्यांत फार आहे—अगदीं भरपूर आहे. अगदीं ग्लोरिअस, मल्टिपल, टेक्निकलरमध्यें !

**लॅची :** *(किंचित् स्तब्ध. मग)* या हॉस्पिटलमधून कधीं सुटणार रे तूं ?

**यांक :** उद्यां एम. ओ. सही करील माझ्या कागदावर. म्हणजे बहुतेक परवां जाईन मी. *(जास्त अल्कोहोल हातावर घेण्याकरतां वांकतो.)*

**लॅची** : परवां तूं गेल्यावर इथं कांहीं खरं नव्हे, यांक. *(एकमेकांकडे पहातात.)* पुन्हा कधींच कांहीं कळणार नाहीं मला तुझ्याबद्दल मग—भेट तर राहोच.

**यांक** : तें कां ? लग्न करीन तेव्हां निमंत्रण-पत्रिका पाठवीन तुला मी.

**लॅची** : मी तुला माझ्या घराचा फोटो धाडीन.

**यांक** : *(उठून अंग चोळत)* त्या 'किल्ट' सह तुझा एक फोटो धाड मला. मिळालं तर तसंच पहायला मिळणार तुझ्या अंगावर यानंतर तें मला.

**लॅची** : उद्यां इथला तुझा अगदीं नक्की अखेरचाच दिवस, मग ?

**यांक** : कर्नल कावर्वेञ्जनं मन बदललं तर गोष्ट वेगळी.

**लॅची** : माझ्या रेजिमेंटमध्यें परतायला मी निघेन तेव्हा 'किल्ट' घालीन असा विचार होता माझा. पण आतां तुझी इच्छा असली तर...

**यांक** : *(चोळणं थांबवतो.)* विचार बदलणार म्हणतोस कीं काय ?

**लॅची** : हो. असं वाटलं कीं तुझ्या दृष्टीनें तेवढं महत्त्वाचं असेल तर मी तुझ्यासाठीं तें किल्ट कां घालूं नये ?

**यांक** : लॅची, असं कर—उद्यां माझ्याकरतां तें घाल, आणि मी तुझा फोटो घेईन. हं ? घरून फिल्मचे दोन कोरे रोल्स आले आहेत मला.

**लॅची** : *(उजळून किंचित् उठून त्याच्याकडे पहात)* तुला गंमत सांगतों, अजून एकसुद्धा फोटो निघूं दिलेला नाही मीं माझा.

**यांक** : तर मग उद्यां काढूं आपण.

**लॅची** : हो—*(पुन्हा सपाट पडत)* मी किल्ट घालीन. पण एक : फिल्मचे पैसे मी देणार.

**यांक** : *(अल्कोहोलची बाटली फडताळावर ठेवून टॉवेल घेत)* त्याची कांहीं गरज नाहीं–माझ्याकडे एक्स्ट्रा रोल आहे. *(लॅचीची पाठ पुसतो.)*

**लॅची** : तें नाहीं चालणार. तुझ्या दोन्ही रोल्सचे पैसे माझ्याकडून घेशील तरच मी माझा फोटो काढूं देईन. मला ते दोन्ही लागतीलसं वाटतं. इथल्या प्रत्येकाचा फोटो हवा मला.

**यांक** : अच्छा ! तुला जास्त प्रशस्त वाटणार असेल तर रोल्सचे पैसे तूं दे. मग तर झालं ? *(टॉवेल ठेवून देतो.)*

**लॅची** : सकाळीं देतों पैसे.

**यांक** : हो हो, आहे, विश्वास आहे माझा. *(आपल्या कॉटकडे जातां जातां वळून)* दिवा घालवूं तुझा ?

**लॅची** : त्या आधीं एक सिगरेट ओढीन म्हणतों. *(यांक सिगरेट देऊं करतो.)* नाहीं. आहे माझ्याकडे.

**यांक** : ती असूं दे. माझी घे.

**लॅची** : *(एक घेतो. डिगर आणि किवि वॉशरूममधून येतात. आपापल्या कॉटकडे जातात.)* थँक यू.

**यांक** : आपण आतां लावणार समाधि ! भारीच झोंप लोटलीय ! *(त्याचा दिवा मालवतो.)*

**डिगर** : *(टॉमीच्या कॉटकडे निर्देश करून)* आज रात्रीं हा टॉमी घोरला तर त्याचे कान छाटून टाकणार मी !

**यांक** : *(मच्छरदाणात शिरत)* संपूर्ण विश्रांतीचे हे असलेच आणखी कांहीं दिवस उलटले तर एक दिवशीं कायमच्या विश्रांतीच्या अवस्थेला येणार आपण ! गुड नाइट, लॅची.

**लॅची** : गुड नाइट, यांक. *(लॅची, मच्छरदाणी नीट करीत असलेल्या डिगरकडे जातो.)* डिगर, उद्यां हें युद्ध थांबलं आणि शांतता झाली, तर पुढं काय बेत केलायस तूं ?

**डिगर** : मी म्हणतोस ? केपटाऊनहून माझी बायको आणि पोरं घेऊन ऑस्ट्रेलियाला परत जाणार.

**लॅची** : नक्कीच फार चांगला देश असला पाहिजे तो—ऑस्ट्रेलिया—पण तिथं जाऊन काय करणार तूं ?

**डिगर** : तिथं माझी पाठ साफ बरी होईल.

**लॅची** : हो. पण स्कॉटलंडमध्यें कांहीं कामधंदा शोधावा आणि तिथंच स्थायिक व्हावें असं कधीं आलं आहे का तुझ्या मनांत ?

**डिगर** : *(मच्छरदाणीचं काम करतां करतां सरळ होत)* माझ्या मनांत ? छे बुवा. असलं कांहीं कुणाच्या मनांत कधीं आलंय ?

**लॅची** : माहीत असेलच तुला, माझी थोडीशी जमीन आहे तिकडे. जमिनी-वर एक छोटंसंच घर आहे माझं. साधंच पण हक्काचं. तूं तुझं कुटुंब घेऊन

कधींहि तिथं आलास तरी चालेल. वाटेल तितके दिवस मोफत राहा. जमीन सुपीक, त्यामुळें पोटापुरत मिळेल ती कसली तर. मला खंड नको.

**डिगर** : मी मोकळा झालों रे झालों कीं दिशा एक—ऑस्ट्रेलिया. *(डोळे मिटतो.)* —ऑस्ट्रेलिया ! आठवण झाली कीं अंतःकरणांत कशी दाढदुखी सुरू होते बघ !

**लॅची** : पण स्कॉटलंडची सर कशाला नाहीं.

**डिगर** : चांगला श्रीमंत झालों ना, कीं येईन मी तुझ्या स्कॉटलंडमध्यें.

**लॅची** : मग काय उपयोग? श्रीमंत झाल्यावर कुणाचीच गरज लागणार नाहीं तुला. मग आपण भेटणं शक्य नाहीं.

**डिगर** : असंच नव्हे कांहीं. आणि खरं तर, मी कधीं श्रीमंत होणारच नाहीं. पण पैज मारायला तयार आहों आपण, आपण दरिद्रीहि कधीं रहाणार नाहीं ! हां ! *(दिवा मालवतो. किवि वाचतो आहे तो उठून मच्छरदाणी पाडतो.)* चित्राचं कार्ड पाठवीन मी तुला. आणि पत्र. *(बिछान्यांत शिरतो.)*

**लॅची** : पत्र लिहिशील तूं मला ?

**डिगर** : हो. पत्र लिहीन.

**लॅची** *(हा नवा अनुभव मनांत घोळवतो आहे.)* माझ्या नांवानं पत्र. लॅचलेन मॅकलॅचलेन. *(गप्प.)* एस्क्वायर.

**डिगर** : *(मच्छरदाणीमधून)* हूं—झोंप मोठी छान वाटते आपल्याला. गुड नाइट, लॅची—*(मच्छरदाणी खोंचून घेतो कॉटभोंवती.)*

**लॅची** : गुड नाइट. *(क्षणभर स्तब्ध उभा. किवि मच्छरदाणी पाडून उभा.)*

**किवि** : आश्चर्य आहे बुवा, अद्याप मला मलेरिया कसा झाला नाहीं हें. झोंपलों कीं रात्रभर पाय मच्छरदाणीबाहेर येऊन रहातात माझे, आणि साले मच्छर समजतात कीं ही 'ब्लड-बँक'च उघडली आहे !

**लॅची** : *(त्याच्याकडे जात)* मोजे घालून कां झोंपत नाहींस तूं ?

**किवि** : मच्छर एकत्र येऊन ओढून काढतील ते. *(मच्छरदाणींत शिरूं लागतो.)*

**लॅची** : मला वाटतं, तुमच्या न्यूझीलंडमध्येंहि मच्छर खूप.

**किवि** : पण ते न्यूझीलंडचे असतात! त्यांना माझं हवं तेवढं रक्त शोषूं दे. माझी कुरकुर नाहीं. एकदां घरीं गेलों कीं प्राण गेला तरी बाहेर पडणार नाहीं पुन्हा!

**लॅची** : *(उसासत)* घरीं जायलाच हवं का तुला?

**किवि** : अर्थात्! पण मी पत्र लिहीत जाईन तुला. संबंध ठेवूंच आपण. मी आतां झोंपतों. दिवा मालवतोस का तेवढा माझा? *(लॅची सिगरेट विझवून किविचा दिवा मालवतो.)* थँक्स. गुड नाइट.

*(ब्लॉसम शुभ्र कपड्यांत येऊन कॉटकडे जातो.)*

**लॅची** : गुड नाइट. *(ब्लॉसमच्या कॉटकडे घुटमळतो. ब्लॉसम पहातो.)*

**ब्लॉसम** : ब्लॉस्—सम! *(लॅची इतरत्र वळतो.)*

**लॅची** : छे. स्कॉटलंडमध्यें नाहीं जमणार तुझं. कांहीं कळणार नाहीं कुणालाच *(ब्लॉसम दिवा मालवतो आणि झोंपतो. लॅची किविच्या बिछान्याकडे जाऊन त्याची मच्छरदाणी उगींच जरा नीट करतो. मग यांकपाशीं जाऊन तेंच करतो. मग स्वतःची मच्छरदाणी पाडतो. मार्गरेट येते. त्याच्याकडे जाते हातांत पला आणि बॅटरी.)*

**मार्गरेट** : वेळ लागला ना मला? स्टोअररूमची चावी कुठं मिळेना, ती शोधावी लागली मला.

**लॅची** : बोलत होतों मी मित्रांबरोबर.

**मार्गरेट** : घ्या. प्या. यानं झोंप येईल. *(पेला त्याच्या हातीं देते.)*

**लॅची** : थँक यू. *(बसतो—पण पीत नाहीं.)* सिस्टर, जगाच्या सगळ्या भागांतू हे सगळे मला पत्रं लिहिणार आहेत. ते म्हणाले तसं. *(तिच्याकडे पहातो.)* माझ्या दृष्टीनं हें किती महत्वाचं आहे, आहे माहीत तुम्हांला?

**मार्गरेट** : तुम्हांला अभिमान वाटायला हरकत नाहीं.

**लॅची** : नुसता अभिमान नव्हे—जास्त कांहीं. जास्त कांहीं, सिस्टर. यानंत कुठंही गेलों तरी मी एकटा नसेन.

**मार्गरेट** : हो. एकटेपणाच्या यातना मला कळतात, लॅची.

**लॅची** : वाईट याचं वाटतं कीं मला कुणासाठीं कांहींच करण्यासारखं नाहीं सिस्टर. आयुष्यांत पहिल्यांदांच कुणासाठीं कांहीं करावं असं वाटूं लागलंय— आणि करायला कांहीं मिळत नाहीं.

**मार्गरेट** : मला वाटतं, खंत करूं नका कसली असं सांगितलंय तुम्हांला मी.

**लॅची** : पण मला कांहींतरी केलं पाहिजे, या हातून कांहींतरी घडलं पाहिजे, सिस्टर. एरवीं फार फार त्रास होतो आहे मला, फार त्रास होतो आहे. माझ्यावर ऋणाचा मोठा बोजा आहे.

**मार्गरेट** : असं ? बरं तर मग. कुणाचं ऋण आहे तुमच्यावर ? तुमच्या मित्रांचं ? बांधवांचं ?

**लॅची** : हो. त्यांच्या चांगुलपणाचा गैरफायदा मी घेतला आहे; बदल्यांत माझी जमीन, माझं घर, सैन्यांतून सुटल्यावर, हक्काचं घरदार नसलेल्या स्थितींतल्या या माणसांसाठीं उपयोगाला यावं असं वाटतं.

**मार्गरेट** : धीमेपणानं घ्या सारं. लक्षांत ठेवा, उतावळ्या मनांत दुःख रुजतं.

**लॅची** : मी उतावळा नाहीं. माझं कर्तव्य मला स्वस्थ राहूं देत नाहीं.

**मार्गरेट** : कुणाचं ऋण तुम्हांला सहन होत नाहीं, असंच ना ?

**लॅची** : कुणासाठीं प्रार्थना करता येत नाहीं मला. एखादं पुस्तक लिहावं म्हटलं तर तेंही जमणार नाहीं. शिक्षण नाहीं मला. आहे फक्त इच्छा—हे दोन हात—आणि द्यायला माझी जमीन. माझं छोटंच घर. बस्स !

**मार्गरेट** : लॅची—तुम्ही जरासा...*(इतर सगळे झोंपले आहेत अशी खात्री करून घेण्याचा विचार करून)* जरा थांबा हं. *(बॅटरीनं सगळ्या कॉट्स तपासून पहाते. मग त्याच्याकडे येते. त्याच्या कॉटच्या पायथ्याशीं बसते. लॅची कप पुन्हा पुन्हा तोंडाला लावतो आहे. मार्गरेट बॅटरी कॉटवर ठेवते.)* हें पहा, तुमच्या मालकीच्या एकेक गोष्टी कुणाला देऊं करण्याऐवजीं स्वतःलाच कां नाहीं इतरांच्यांत एकरूप करीत तुम्ही ? त्यांत आपणा सर्वांचा किती तरी फायदा होईल. तुमच्या सहवासानं माझा फायदा झाला आहे.

**लॅची** : माझ्या सहवासानं म्हणतां ? फायदा ? छे छे—

**मार्गरेट** : तुमच्याच सहवासानं, आणि फायदाच. माणूस म्हणून मला मोठंसं स्वतंत्र आणि अस्सल व्यक्तित्व आहे असं मला वाटत नाहीं. मला भेटलेल्या माणसांत मी नेहमींच एकजीव होत आलें आहे. वाचलंय, पाहिलंय त्या साऱ्याचं एक अजब मिश्रण माझ्यांत मला एकेकदां प्रतीत होतं. कुठं एखादा गुण मीं घेतला आहे, तर कुठं एखादी उणीव उचलली आहे. मी आहे मला आवडलेल्या साऱ्या माणसांतल्या चांगल्यावाईट वैशिष्ट्यांची बनलेली.

**लॅंची** : माझ्यापासून कांहीं घेतलंय तुम्ही ?

**मार्गरेट** : हो, तुमच्या नकळत.

**लॅंची** : खरं सांगतों सिस्टर, तो शार्पनेल माझ्या पोटांत न घुसता तर आनंद काय असतो तो कळलाहि नसता मला. शहाणपणा यायला रक्त ओतावं लागल मला.

**मार्गरेट** : त्याशिवाय कळलं तें कळलंच नसतं असं मुळींच नव्हे. पण झालं त्याचा फायदा झाला हें मात्र खरं.

**लॅंची** : *(विचार करीत)* खूप माणसं आजारी पडतीं, जखमी होतीं तर हें जग अधिक चांगलं झालं असतं असं नाहीं वाटत तुम्हांला, सिस्टर ?

**मार्गरेट** : मला—मला त्यांत कळत नाहीं. *(उठते, कप उचलून फडताळावर ठेवते.)* आतां तुम्ही झोंपा.

**लॅंची** : आज रात्रीं आतां नाहीं झोंप यायची मला. मन मोकळं करायचंय, पण शब्द कुठं आहेत, सिस्टर ? शब्द नाहींत.

**मार्गरेट** : आमच्या सहवासांत सुखी झालांत तुम्ही, इतके कधींच झालां नव्हतात ?

**लॅंची** : स्वर्गसुख भोगतोंय मी.

**मार्गरेट** : *(संथपणें)* गुड नाइट, लॅंची. *(जाऊं लागते.)*

**लॅंची** : *(रोखत)* सिस्टर मार्गरेट, तुम्हांला आणखी एक गोष्ट माहीत आहे ?

**मार्गरेट** : कोणती ?

**लॅंची** : तुमच्या नकळत तुम्हींहि मला कांहीं दिलं आहे.

**मार्गरेट** : *(त्याच्याकडे येत)* काय तें ?

**लॅंची** : तें—तें मलाहि नक्की कळत नाहीं, पण कांहीं तरी नवीन—पूर्वी कधीं अनुभवलं नाहीं असं—त्यामुळं तुम्ही इथून जातांना मला दिसलां नाहींत तरी तुम्ही खोलीबाहेर गेलां हें समजतं मला—आपोआप.

**मार्गरेट** : कांहींतरीच. *(आपला हात त्याच्या खांद्यावर ठेवते.)*

**लॅंची** : फार फार बरं वाटतं आहे आतां मला. *(तिचा हात हातीं घेतो, ओठांवर घट्ट टेकतो. मग सोडून देतो.)*

**मार्गरेट :** *(गांधळून)* कां केलंत हें ?

**लॅची :** खरंच. हक्क नव्हता मला. *(क्षणभर मार्गरेट त्याला तशी न्याहाळते. तो वर तिच्याकडे पहातो. मुद्रेवर औत्सुक्य, कृतज्ञता. तो फारच पोरगेला दिसतो आहे. मार्गरेट त्याचा चेहरा दोन्ही पंजांत धरते आणि त्याचं चुंबन घेत.)*

**मार्गरेट :** खरंच हक्क नव्हता. *(पळून जाते. लॅची उठतो आणि तिला जातांना पहातो. मग झटक्यानें त्याच्या बॅगपाइपकडे जातो—तो खालीं काढून घेऊन बसतो. तो वाजवूं लागणार तों त्याच्या लक्षांत ये की सगळे झोंपले आहेत. कुणी उठले कीं काय म्हणून उजवी डावीकडे पहातो. मग मोठ्या काळजीपूर्वक बॅगपाइप त्याच्या आवरणांत बंद करून ठेवतो—उठतो —आणि तो खुंटीला लावायला अच्चळ जातो.)*

# अंक तिसरा

## *प्रवेश १ ला*

*[दुसऱ्या दिवशाची दुपार. तीच जागा. पडदा उघडतो तेव्हां : मार्गरेट मागल्या बाजूला कॅमेरा घेऊन उभी आहे. टॉमीच्या कॉटच्या भोंवती सहा पेशंट्स उभे आहेत. अगदी कडेला ब्लॉसम. त्यानंतर किवि. किविच्या पुढें टॉमी. टॉमीलगत लॅंची. त्याचं किल्ट, कॅप वगैरे सरंजाम त्यानं पेहेनेला आहे. हात बांधून तो उभा आहे. त्याच्या-नंतर यांक. आणि मग डिगर. सगळ्यांच्या मुद्रा गंभीर आणि तंग. लॅंचीच्या कॉटभोवतीं आडोशाचे पडदे.]*

**मार्गरेट** : पूर्वीं सर्कसमध्यें 'लिव्हिंग स्टॅच्यूज्' चा प्रकार असे, त्यांतले तुम्ही दिसतांहा. *(हातवारे करीत)* जरा जवळ सरका ना एकमेकांच्या. *(ते तसे करतात.)* आतां जरा हंसरे दिसा.

**टॉमी** : सिस्टर, मी दोन्ही बाजूंनीं चेंगरला गेलों आहे.

**किवि** : सिस्टर, या टॉमीला मागें उभा केलात तर पुढें बरीच जागा होईल.

**मार्गरेट** : टॉमी, जरा कॉटवर बसा. *(आपली जागा सोडून सर्वांना ओलांडून टॉमी मागें जातो आणि कॉटवर बसतो.)*

**किवि** : आहा ! बरं वाटलं—माझ्या पायावर लेकाचा उभा होता !

**टॉमी** : मलाहि बरं वाटलं. त्याच्याच काय, माझ्याहि पायांवर मी उभा होतों *(थोडासा हंशा.)*

**मार्गरेट** : *(कॅमेऱ्यांत पहाते. येथवर लॅंची दगडासारखा निश्चल उभा आहे.* लॅंची, तुम्ही जरा जास्त हंसतां का ?

**लॅंची** : सिस्टर, मी सिनेमा स्टार नाहीं. हुकमी ॲक्टिंग मला येत नाहीं.

**मार्गरेट** : जास्त हंसतां येत नसेल तर कमी लांब चेहरा करा.

**लॅची** : आतां घेऊन टाकतां का फोटो ?

**मार्गरेट** : बरं, बरं. टाइम एक्स्पोजर आहे बरं का. सगळ्यांनीं अगदीं हलूं नका. *(सगळे ताठ, स्तब्ध.)* रेडी ? हंसा. *(लॅची सोडून सगळे एक कृत्रिम स्मित करतात.)* एक...दोन...तीन... *(ती ताठ होते.)* हा चांगला निघाला असणार. *(सत्त्वपरीक्षा संपल्याचे उसासे. लॅची त्याच्या आडोशाकडे जातो. यांक कॉटवर बसतो. टॉमी कॉटवर आडवा होतो. डिगर कॉटशीं उभा राहून सिगरेट काढतो. किवि यांकच्या कॉटच्या उशाशीं टेकतो. ब्लॉसम मार्गरेटच्या ऑफिसच्या दाराशी उभा. मार्गरेट आडोशाआड जाणाऱ्या लॅचीला अडवते.)* लॅची, तुम्ही सोडून सगळ्यांचे एकेकट्याचे फोटो झाले. तुम्हीच राहिलांत. आतां तुमचा एक.

**डिगर** : हां हां.

**लॅची** : नको.

**डिगर** : आतां नको-बिको नको, लॅची. आम्हांला एकेक कॉपी हवी तुझ्या फोटोची.

**टॉमी** : आमचे नाहीं का आम्हीं घेऊं दिले ?

**मार्गरेट** : तुम्ही या तुमच्या किल्टमध्यें असे रुबाबदार दिसतां—हं, रहा उभे !

**किवि** : त्यांत थोडंच कांहीं नुकसान आहे तुझं ?

**लॅची** : हें पहा, फिल्म माझ्या पैशाची आहे आणि मी माझा फोटो निघूं देणार नाहीं.

**यांक** : कारण सांग.

**लॅची** : मला एकट्याला तें फोटोबिटोचं जमणार नाहीं. *(आडोशांआड जायला पुन्हा निघतो. डिगर सिगरेट शिलगावतो.)* मी आतां किल्ट उतरून ठेवतों.

**मार्गरेट** : एकच एक्स्पोजर बाकी उरलं आहे—हवा तर एक्स-रे निघाला असं समजा—

**यांक** : हा शेवटचा घेऊन झाल्याशिवाय आमचे फोटो आम्हांला डेव्हलप करून घेतां येणार नाहींत.

**डिगर** : हं, चल रे—

**लॅची :** *(कुरकुरत)* ठीक आहे—आतां तुम्ही म्हणतांच तर—

**यांक :** गुड. *(उठून लॅचीला धरून यांकच्या कॉटशीं उभा करतो.)*

**लॅची :** जरा घाई होते आहे सगळी—पण होऊं द्या एकदांचं तुमच्या मना-प्रमाणं. *( यांक मार्गरेटच्या पायाशीं, कॅमेऱ्याखालीं दया धरल्यासारखा बसतो. डिगर त्याच्या कॉटवर बसतो. किवि टॉमीच्या कॉटवर पाय रोवून उभा.)*

**यांक :** हां, आतां असं समज कीं तुझ्या स्कॉटलंडमध्यें आहेस तूं—हिरवळींत उभा आहेस—सडकेवर लांबपर्यंत बघतो आहेस—*(लॅची उजवा पाय पुढें, डावा मागें, हनुवटी पुढें, एक हात पुढें आणि दुसरा पाठीमागें असा उभा रहातो.)*

**मार्गरेट :** हा सगळ्यांत चांगला निघायला हवा हं. *(कॅमेऱ्यांत पहाते. लॅचीला त्याच्या हातांची अवस्था आतां आवडत नाही म्हणून तो ' पोज ' बदलतो.)* स्टॅण्ड स्टिल, लॅची.

**डिगर :** एकादा वांकडा तिकडा पाइप द्यायला हवा होता याच्या तोंडांत.

**टॉमी :** आणि एक कुत्राहि हवा होता पायांशीं.

**यांक :** आतां कुणी कांहीं बोलूं नका. *(लॅची अजून हातांचे पवित्रे घेऊन पहात आहे.)*

**मार्गरेट :** चुळबुळ नको, लॅची. फोकस बिघडतो.

**लॅची :** माझ्या हातांची मोठी अडचण झाली आहे.

**डिगर :** खिशांत ठेव. *(अस्तित्वांत नसलेल्या खिशांसाठीं लॅचीचे हात चांचपडतात. त्याच्या मुद्रेवर वाढती नापसंती. टॉमीच्या डोक्यांत कांहीं तरी येतं. तो अच्चळ जाऊन त्याचा ' फ्लाय स्वॅटर ' उचलतो. आपली कॉट यांकची कॉट ओलांडून रांगत रांगत, लॅचीचं ' किल्ट ' मागल्या बाजूनें ' स्वॅटर ' नें वर करून पहाण्याचा प्रयत्न करतो. डिगर आणि किवि वाढत्या उत्सुकतेनं हें पहात आहेत.)'*

**मार्गरेट :** हात जरा कमरेवर ठेवा, लॅची. तसं कसं काय दिसतं, पाहूं. *(लॅची हें मानतो.)* ऊंहूं. बरं नाहीं दिसत. काढा हात.

**डिगर :** हात कपाळावर आडवा धरून हा आपल्या मेंढ्या शोधतो आहे असं ' प्रोफाइल ' मध्यें घेतलं तर कसं दिसेल ?

**मार्गरेट :** जरा गप्प रहा पाहूं सगळे. लॅची, ऐकूं नका कुणाचं. *(आतां तिचं टॉमीकडे प्रथमच लक्ष जातं. त्याच्यापर्यंत जाऊन 'श्शू' करून त्याला लांब पिटाळते.)* टॉमी, फोटोबाहेर व्हा! *(टॉमी, किवि आाण डिगर गडबडीनें मूळच्या पवित्र्यांत पुन्हा आपापल्या जागीं उभे रहातात. मार्गरेट पुन्हा तिच्या मूळ जागीं जाते आणि कॅमेरा सज्ज करते. दरम्यान हात छातीवर बांधून उभं रहाण्याचा निर्णय लॅचीनं घेतला आहे. टॉमीनं 'किल्ट' उचलून पहाण्याचा त्याचा प्रयत्न सोडल्यासारखा प्रथम दिसतो, पण खरं म्हणजे दुसऱ्या बाजूनं त्याचा तोच प्रयत्न पुन्हा चालू आहे.)* हं, आतां हंसा पाहूं. हंसा. *(लॅचीची मुद्रा तंग.)* लॅची, हंसा.

**लॅची :** *(पवित्रा टाकून)* **मला—हंसवत—नाहीं!** *(त्याच्या या आकस्मिक उबळीनं टॉमी, किवि, डिगर पुन्हा आपापल्या जागीं.)*

**यांक :** *(लॅचीला मूळ स्थितींत उभं करण्याकरतां उठत)* त्याचा अंत पाहिला तुम्ही, सिस्टर. आतां झटक्यानं टाका उरकून जसं जमेल तसं. हं— *(टॉमी तोंडांत 'स्वॅटर' धरून त्याच्या कॉटखालीं हळू हळू सरपटत निघतो. यांक मार्गरेटच्या पायांशीं.)*

**मार्गरेट :** काढतें हं आतां फोटो—एक...दोन...तीन. *(फोटो काढून हंसत वर पहाते.)* खलास! झालं एकदांचं सगळं.

*(लॅची डावीकडल्या दाराकडे जातो. यांक उठून त्याच्या कॉटकडे जातो. टॉमी यांकच्या कॉटखालीं सरपटत असतां लॅचीनं जागचं हलून त्याचा बेत फसवला आहे.)*

**यांक :** *(हंसत लॅचीला)* कमाल बुवा तुझी!

**लॅची :** मला वाटलं होतं कीं मित्र आहां तुम्ही सगळे माझे.

**यांक :** आहोंतच. कांहीं म्हण लॅची, पण किल्ट पेहेनून चिडलेला स्कॉट म्हणजे कहर गोष्ट आहे! *(टॉमी जागचा उठून त्याच्या आणि यांकच्या कॉटदरम्यान उभा रहातो.)*

**मार्गरेट :** थॅंक यू, लॅची. फारच समजुतीनं घेतलं तुम्ही. आणि दिसलात पण देखणे. *(कॅमेरा यांककडे देते.)* यांक, तुम्ही एक्स-रे रूमकडे जाऊन ते लोक आपले फोटो डेव्हलप करून देतात का विचारा. *(ऑफिसच्या दाराकडे निघते.*

*ब्लासम त्याच्या काटकड येतो. लॅंची मार्गरेटकरतां तिच्या ऑफिसचा दरवाजा उघडून धरतो.)*

**मार्गरेट** : आतां तुमच्यापैकीं कांहींनीं जाऊन 'सी' वॉर्डातून बाथ-टब घेऊन या. आठवडाभर आपल्याला वापरायला मिळणार आहे तें.

**किवि** : मी जाऊं, सिस्टर! तेवढेच जरा पाय मोकळे होतील.

**मार्गरेट** : कुणीहि जा—टब आणा म्हणजे झालं. *(ती जाते. लॅंची आडोशा-कडे जाऊं लागतो.)*

**लॅंची** : किल्ट उतरून ठेवतों मी आतां.

**टॉमी** : ओह्, लॅंची!—

**लॅंची** : *(वळत)* काय झालं?

**टॉमी** : प्लीज—जर एक मिनिट थांबतोस का? तुझा हा थाट एकदां जरा नीट पाहीन म्हणतों—

**लॅंची** : फोटोंत पहा. *(आडोशाकडे अधिक प्रगति.)*

**टॉमी** : ए, अरे अगदीं एकच मिनिट उभा रहा!

**किवि** : जरा चालूनच दाखव ना. *(टॉमी यांकच्या कॉटवर टेकतो. किवि टॉमीच्या कॉटवर. डिगर स्वतःच्या कॉटवर. यांक त्याच्या आणि टॉमीच्या कॉटच्या दरम्यान उभा. डिगर दार लावून घेतो.)*

**लॅंची** : म्हणतांच तर घ्या एकदां पाहून. *(अत्यंत रुबाबांत चालून दाखवतो. तो चालत असतांना प्रत्येकजण त्याच्या 'किल्ट'च्या मागचा शेव अलगद वर करून आंत पहाण्याचा प्रयत्न करतो.)*

**डिगर** : हें वापरायचं तर पाय घाटांत हवेत—तुझे आहेत असे. *(लॅंची आणखी फेरी मारतो. डिगरच्या हातीं शेव लागतो, निसटतो.)* किती रुबाब-शीर दिसतं, पहा. *(टॉमी आणि किवि शेव पकडूं पहातात. पण जमत नाहीं. लॅंची थांबून त्यांच्याकडे पुढा करून रहातो.)*

**टॉमी** : *(वेगळी काय क्लृप्ती काढावी या विचारांत)* आतां तूं वळतांना कसा दिसतोस तें जरा पाहूं रे. 'किल्ट'चं काय होतं वळतांना?

**लॅची** : किंचित् पसरतं. *(संथपणें वळतो आण 'किल्ट'चा थोडासा घोळ होऊन तें पुन्हा पूर्ववत्. हें हातांना चौघेहि पट्‌दिशीं खालीं वाकून पुन्हा एकदमच सरळ होतात.)*

**टॉमी** : *(निराश, पण निरुत्साही नव्हे.)* आतां एकदम स्वतःभोंवतीं गिरकी मारलीस तर काय होतं किल्टचं ?

**लॅची** : कांहीं नाहीं.

**टॉमी** : मला वाटतं फारच सुंदर दिसेल तें गिरकी घेतांना. नाहीं, डिगर ? लॅची, पाहूं दे आम्हांला. एक गिरकी घे. *(टॉमी एका गुडघ्यावर टेकतो. लॅची गिरकी मारतो. सारीं डोकीं खालीं कलतात आणि तीं वर होत असतांना मार्गरेट ऑफिसच्या दारांत.)*

**मार्गरेट** : तें टब कुणी आणतंय कीं नाहीं ? *(टॉमी किल्टकडे पहात गुडघ्या-वरच टेकलेला.)*

**किवि** : हा चाललों ! *(किवि आणि यांक लगबगीनें जायला निघतात. मार्गरेट पुन्हा आंत गेलेली.)*

**लॅची** : *(यांकला)* यांक, जरा थांबत असशील तर तुला कांहीं विचारायचंय मला.

**यांक** : मला ? थांबतों कीं. *(इतरांना)* जा रे, तुम्ही जा.

**डिगर** : *(टॉमी जागचा उठत असतां)* चल रे भोपळ्या. टब तुलाहि लागणार आहे.

**टॉमी** : मला अज्ञानांत ठेवण्याचा कट आहे हा ! *(डिगरमागून जातो. जातांना दरवाजा लावून घेतो. ब्लॉसम उरला आहे. तो खिडकीबाहेर पहात बसला आहे.)*

**यांक** : काय म्हणतोस ?

**लॅची** : *(नापसंतीची मुद्रा करून)* घरीं परत गेल्यावर लग्न करणार असं म्हणाला होतास तूं.

**यांक** : थाटानं. अगदीं 'ठो ठो' करून !

**लॅची** : लग्न केलंच पाहिजे असं कधींपासून वाटूं लागलं तुला ?

**यांक** : माझ्या वाग्दत्त वधूचं, म्हणजे होतकरू बायकोचं प्रथम चुंबन घेतलं मीं, तेव्हांपासून.

**लॅची** : चुंबन.

**यांक** : हो. घेतलं बुवा.

**लॅची** : एकादी चांगली बाई एकाद्या पुरुषाचं चुंबन घेते तेव्हां तें लक्षण त्यानं पुरेसं आशादायक मानायला हरकत नाहीं. नाहीं का ?

**यांक** : हो. चांगल्याचं कीं वाईटाचं तें सांगतां आलं नाहीं तरी आशादायक नक्कीच.

**लॅची** : कांहींतरी अननुभूत आणि शब्दांत सांगता न येण्यासारखा असेल तो अनुभव ?

**यांक** : तसा सांगता येईल तर काय झालं. मला अगदीं नीट सांगता आला असता. पण तो कुणाला सांगण्यांत मौज वाटत नाहीं.

**लॅची** : *(यांकच्या कॉटवर टेकत)* मलाही लग्न करायची इच्छा असावीसं अलिकडे मला वाटतं.

**यांक** : वाटतं ? नक्की ठरलं नाहीं अजून कांहीं ?

**लॅची** : तोच तर प्रश्न आहे सध्यां माझ्यापुढें. एकाद्या मुलीला—म्हणजे स्त्रीला—लग्नाबद्दल मीं विचारलं तर कांहीं बिघडेल असं वाटतं का तुला ? माझी परिस्थिति आहेच तुला माहीत. *(यांक गप्प.)* बोल ना. कचरूं नकोस. स्पष्ट काय तें सांग.

**यांक** : 'परिस्थिति' म्हणजे नेमकं काय म्हणायचं आहे तुला ?

**लॅची** : परिस्थिति हीच कीं आतां मी लग्न केलं तर युद्ध संपेपर्यंत मला माझ्या रेजिमेंटमध्येंच रहावं लागेल. माझ्या बायकोच्या दृष्टीनें हें योग्य होईल ? तिला हें चालेल ?

**यांक** : लॅची—म्हणजे—तूं—*(ऑफिसच्या दाराकडे निर्देश करतो.)* हूं ?

**लॅची** : हो. सिस्टर मार्गरेटशीं.

**यांक** : पण—पण तें शक्य नाहीं !

**लॅची** : कां ? तिचं लग्न अजून झालेलं नाहीं.

**यांक** : हें पहा लॅची—म्हणजे—प्रत्येकजण केव्हां ना केव्हां नर्सच्या प्रेमांत पडत असतो—तें सहाजिक आहे. या वॉर्डांतला प्रत्येकजण केव्हां ना केव्हां सिस्टर मार्गरेटच्या प्रेमांत पडलाय—याबद्दल वाटलं तर पैज मारीन मी. आणि

त्यांत आश्चर्य तरी कसलं. ती आपली काळजी वहाते, आपल्याशीं प्रेमळपणें वागते. पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं ती आपल्या प्रेमांत पडली आहे. तो तिचा व्यवसाय आहे. यापेक्षां जास्त अपेक्षा आपण ठेवली तर ती चूक होईल मोठी.

**लॅची :** हो. मला तुला विचारायचं होतं एवढ्याचकरतां. तूंहि मूळचा स्कॉट आहेस. *(यांक साश्चर्य वळून पहातो )* बरं, एकाद्या पेशंटचं सिस्टर मार्गरेटनं चुंबन घेतल्याचं ऐकलंयस तूं ?

**यांक :** *(लॅचीकडे येत)* निदान माझा तरी हा अनुभव नाहीं.

**लॅची :** तर मग एकाद्याचं तिनं राजीखुषीनं चुंबन घेतलं, तर त्याचा अर्थ काय होतो ?

**यांक :** तुझं चुंबन घेतलं तिनं ?

**लॅची :** हो.

**यांक :** ओह !

**लॅची** *(हळूवारपणें)* तिच्या रेशमी हातांत तिनं माझा चेहरा धरला—आणि माझं चुंबन घेतलं.

**यांक :** मला वाटतं लॅची, बायका पुरुषांचं चुंबन घेतात तेव्हां त्यांच्या मनांत लग्नच असतं असं नव्हे.

**लॅची :** म्हणजे सिस्टर मार्गरेट इतकी 'फ्री' आहे असं म्हणायचंय तुला ?

**यांक :** *(टॉमीच्या कॉटवर बसत)* नाहीं.

**लॅची :** मग तिनं माझं चुंबन घेतलं त्यांत कांहीं अर्थ होता ना ?

**यांक :** कांहीं तरी अर्थ असेल.

**लॅची :** काल रात्रभर झोपेविना पडून मी माझ्या भाग्याचा सारखा हेवा करीत होतों. तरी पण कांहींतरीच वागून मूर्खपणा पदरीं घ्यायचा नाहीं मला. *(यांकला)* मीं तिला सरळच विचारलं तर तें कसं होईल असं तुला वाटतं ? वेडेपणा होईल तो ? हंसं होईल माझं ?

**यांक :** कांहीं सांगतां येत नाहीं.

**लॅची :** पण घडलंय तें माझ्या बाजूनं आहे.

**यांक :** *(गप्प. मग)* ठीक आहे, मार गोळी. तेवढं महत्त्व त्यांत तुला वाटत असेल, धोका पत्करावासा वाटत असेल तर तेंच कर.

**लॅची** : बरं तर. मी तिला विचारीन. कसं विचारायचं तेंहि ठरवून ठेवलंय मीं मनांत.

**यांक** : तूं जास्त झोंपशील आणि कमी विचार करशील तर फार बरं होईल बघ. *(मार्गरेट गोळ्यांची बाटली आणि पाण्याचा ग्लास घेऊन येते. लॅची जागचा उठतो.)*

**मार्गरेट** : *(कपाटाकडे जात)* लॅची, औषध आणलंय तुमचं. *(ब्लॉसमला* काय ब्लॉसम ? एकटाच ? *(ब्लॉसम बसल्या जागेवरून उठून तिच्याकडे पाहून स्मित करतो. मार्गरेट बाटली उघडून एक गोळी काढते.)*

**यांक** : *(उठत)* हीच संधि आहे.

**लॅची** : म्हणजे आत्तां विचारूं ?

**यांक** : तात्काळ.

**लॅची** : ठीक आहे. किल्ट तसंच अंगावर ठेवलं तें बरं केलं. माझ्या कामांत त्याचा व्यत्यय नाहीं ना यायचा ?

**यांक** : असूं दे तें.

**मार्गरेट** : *(लॅचीकडे गोळी आणि पाणी घेऊन येते.)* एम. ओ. नं या गोळ्या घ्यायला सांगितल्यायत तुम्हांला.

**लॅची** : गोळ्यांचा त्रास आहे झालं हा. *(पाणी, गोळी घेतो.)*

**यांक** : *(लांब जात)* भेटूं आपण मग, लॅची. *(ब्लॉसमला)* ब्लॉसम ! चल. *(ब्लॉसम निघतो. यांक त्याचा हात धरतो.)* बाहेर नेऊन दुसरा एक नवीन शब्द शिकवतों तुला. उपयोगाला येईल. *(ते दोघे जातात.)*

**मार्गरेटः** : काय म्हणतां ?

**लॅची** : मला पाण्यांत पहातो कर्नल. मुद्दाम माझा पाणउतारा करण्यासाठीं गोळ्या दिल्यायत या मला.

**मार्गरेट** : ज़रा वागावं त्याच्या मनासारखं—बिचारा म्हातारा तर आहे !

**लॅची** : तें समजतं मला. मी त्याला हें बोलणार नाहीं. *(गोळी गिळतो, वर पाणी, मार्गरेट ग्लास घेऊन जाऊं लागते.)* सिस्टर, एक मिनिट वेळ आहे ?

**मार्गरेट** : *(थांबते. वळते.)* मेट्रनला भेटायला जायचं होतं मला. पण काय काम आहे तुमचं ? काय हवंय तुम्हांला ?

**लॅची** : लग्नाबद्दल विचारण्याचं मनांत आहे माझ्या. बसून घ्याल तर बरं.

**मार्गरेट** : *(टॉमीच्या कॉटवर बसते ग्लास कॉटवर ठेवते.)* हो हो. *(गप्प.)* लग्नाबद्दल मला विचारणार आहां तुम्ही ?

**लॅची** : हो. आणखी कोणाला ?

**मार्गरेट** : ओह !

**लॅची** : *(यांक आणि टॉमीच्या कॉटदरम्यान जाऊन)* एकदां तुम्हांला म्हणालों होतों मी कीं लग्नाचा माझा विचार नाहीं. आठवत असेल तुम्हांला.

**मार्गरेट** : चांगलं आठवतं.

**लॅची** : बऱ्याच गोष्टी बोलल्याबद्दल वाईट वाटतं अलिकडे मला. त्यांतली एकः ती.

**मार्गरेट** : *(विमनस्क होते. दीर्घ श्वास घेऊन)* लॅची, तुम्हांला वास्तविक—

**लॅची** : मध्यें बोलूं नका ना जरा. वर वर मी फारसा मर्दानी वाटत नसलों तरी खरं म्हणजे माझी महत्त्वाकांक्षा आणि चिकाटी फार मोठी आहे. स्कॉट-लंडमध्यें माझी थोडीशी जमीन आहे, घर आहे हक्काचं, हें तुम्ही जाणतांच. माझी प्रकृति उत्तम आहे—कर्नलचा माझ्यावर डूख आहे म्हणून त्यानं मला इथं ठेवलंय ती गोष्ट वेगळी. माझं माथं जरा गरम आहे—पण तुम्हांला कधीं त्याचा त्रास मी होऊं देणार नाहीं. माझी शिकस्त करीन मी. लष्करांत असे-पर्यंत मला पगार आहेच. तो किती मिळतो तें आहे तुम्हांला माहीत. तो मी तुमच्या नांवें करून देईन. जवळचं सारं तुम्हांला देईन मी. अन्नाची ददात तुम्हांला पडणार नाहीं आणि घरभाड्याचीहि नाहीं. वयाच्या सातव्या वर्षापासून कष्टांची संवय आहे मला. मी केबिन बॉय, सी–मन, सुतार, शेतकरी, खाणकामगार, बंदरावरचा मजूर आणि लष्करांत स्टाफ सार्जंट अशीं कामं केलीं आहेत. तुमच्याकरतां मी सतत कष्ट करीन. माझं वय एकविशीचं आहे. मी औरस नव्हे—आईचं लग्न झालं नव्हतं माझ्या. माझे दांत उत्तम स्थितींत आहेत. माझ्या अंगावर कुठंहि गोंदलेलं नाहीं. माझ्या मागणीचं उत्तर देतांना तुम्ही अविचारानं वागूं नये एवढीच इच्छा आहे.

**मार्गरेट** : *(डोळ्यांवर हात घेऊन बसलेली)* मीं तुमच्याकरतां कांहीं केलं त्या बदल्यांत का मला सारं देऊं करतां आहां तुम्ही ?

**लॅची** : माझं सर्वस्व मी तुम्हांला देऊं करतों आहे. कारण तुमच्याविना त्याला कांहीं अर्थ नाहीं.

**मार्गरेट** : *(उठते, त्याच्यापासून लांब होते. डिगरच्या कॉटशीं येत)* सोप्या नसतात या गोष्टी.

**लॅची** : आणखी कुणी आलं आहे तुमच्या आयुष्यांत ?

**मार्गरेट** : तसं नव्हे तें.

**लॅची** : माझ्या भावना तुम्हांला तुमच्या वाटत नाहींत ? *(वाट पाहून खचत)* तुम्हांला उगींच दुःख दिलं मीं. फार कांहीं धरून चाललों. क्षमा करा मला.

**मार्गरेट** : *(त्याच्याकडे वळते. गोंधळल्या आवेगानें)* ओह्, यू रेचेड स्टबर्न लिट्ल् मॅन ! व्हाय मस्ट आय लव्ह यू ? कां प्रेम केलंच पाहिजे तुझ्यावर मीं ? कां ?

**लॅची** : मला बुचकळ्यांत टाकूं नका—होय, कीं नाहीं ?

**मार्गरेट** : *(किंचित्कालानें)* होय.

**लॅची** : *(तिच्यावर टक लावून)* होय ! विश्वास बसत नाहीं माझा. *(तिचे हात हातीं घेतो.)* लग्न करणार तुम्ही माझ्याशीं ?

**मार्गरेट** : तुम्हांला जरूर आहे ना माझी ? *(अधोमुख. मग)* नेहमींच प्रथम **मीं** एकाद्या गोष्टींत पुढाकार घ्यायला हवा ?

**लॅची** : *(तिची अपेक्षा जाणून तिचं हळूच आणि किंचित् नवखेपणानं चुंबन घेतो. मग एकदम तिला कवटाळून उचंबळल्या भावनांना वाट देतो. मग तिला दूर करून हाताच्या अंतरावर धरतो.)* माझी मागी.

**मार्गरेट** : *(हंसत)* चला—मागी नव्हे. *(टॉमीच्या कॉटच्या पायथ्याशीं बसतात.)*

**लॅची** : यापुढें तुला त्रास होईल असं कांहीं करणार नाहीं मी.

**मार्गरेट** : वचनं नकोत म्हटलं मला.

**लॅची** : *(एकदम शंकित होऊन)* पण माझ्याबद्दल तुला कसं कांहीं वाटणार ?

**मार्गरेट** : वचनं नकोत तशा शंकाहि नकोत.

**लॅची** : बरं—नाहींत शंका. बस्स ?

*(दरवाजावर दणका.)*

**टॉमी** : *(बाथ-स्टूल धरून पाठमोरा आंत येतो.)* दरवाजाला जप, मूर्खा ! सगळं इस्पितळ भुईसपाट करशील—जपून—

**डिगर :** *(बाथटब धरून पुढच्याकडून आंत येत)* आपली पैज, याच टबांत चहा उकळवतात ते !

**किवि :** *(बाथ टबची दुसरी बाजू धरून आंत येत)* ठरली पैज. *(सगळे वॉशरूमकडे जातात. पुढें टॉमी.)*

**टॉमी :** माझा बेत आहे, या टबांत बसूनच कपडे धुवायचे.

**किवि :** यांत एकदां बसलास तूं कीं आयुष्यभर याच्यासकट फिरावं लागेल लेका तुला ! *(जातात.)*

**मार्गरेट :** *(उठून लॅचीचं झटक्यानं चुंबन घेऊन)* मेट्न वाट पहात असेल—

**लॅची :** *(तिचा हात पकडून)* केव्हांपासून मी वाट पहात होतों तुझी !

**मार्गरेट :** तुम्हांला बऱ्याच गोष्टी ऐकवायच्या आहेत मला—पण मला वाटतं कधींच ऐकवूं शकणार नाहीं मी त्या. फार मजल मारली आपण एका झेपेंत; आतां मागं वळून पहाण्यांत अर्थ नाहीं. *(कुठं तरी यांकची शीळ. मार्गरेट नीट-नेटकी होते. जाते. यांकची आणि तिची वाटेंत गांठ. तो गेल्यावर यांक दार लावून घेतो. लॅची उठला आहे जागचा. डोक्यावर टोपी ठेवतो आणि फेऱ्या मारतो आहे.)*

**यांक :** हं. काय झालं बाबा ?

**लॅची :** तुम्हां लोकांचा एवढा विरोध नसता, तर माझा बॅगपाइप वाजवत बसलों असतों मी आतां.

**यांक :** कळलं उत्तर.

**लॅची :** *(साश्चर्य)* तिनं हो म्हटलं, यांक ! शी लव्हूज मी !

**यांक :** लग्न कधीं करताय ?

**लॅची :** तारीख ठरली नाहीं अद्याप. पण तूं हवास माझ्या लग्नाला करवला म्हणून !

**यांक :** करवला ना ? हो हो. कां नाहीं.

**लॅची :** थॅंक यू, यांक. *(कसा तरी हस्तांदोलन करतो.)* आतां तुझी हरकत नसेल तर 'किल्ट' उतरून ठेवतों मी. *(आडोशाकडे जातो.)*

**यांक :** *(मागून जात)* मी नुसता बाजूला बसून पहातों.

**लॅंची** : तुझी हरकत नसेल तर जरा पडेन प्रथम. थकलों आहे खूप. *(यांक होकार देतो.)* थॅंक यू. *(लॅंची आडोशांआड होतो. यांक उभा आहे. टॉमी आणि किवि वॉशरूममधून येतात.)*

**डिगर** : *(टॉमीला)* हें बघ, यापुढें आंघोळीला जाशील तेव्हां एक टॉवेल, थोडासा सेंटेड साबण आणि एक 'कॅन-ओपनर' घेऊन जात चल. *(ब्लॉसम येतो. टॉमीच्या नजरेला यांक पडलेला.)*

**टॉमी** : *(त्याला)* किल्ट उतरतो आहे वाटतं ? *(यांक होकार भरतो. टॉमी चुटकी वाजवून इतरांना जवळ बोलावतो. डिगर, किवि टॉमीमागें जमतात. यांकच्या कॉटवरून वांकून ब्लॉसम यांत सहभागी होतो. टॉमी खाली वांकून आडोशाच्या फटीतून पाहूं लागतो. डिगर खांद्यावर थापटी मारून त्याला 'काय दिसतंय' म्हणून विचारतो. टॉमी शर्ट काढण्याचं 'ॲक्टिंग' करून दाखवतो. किविला सारं अनावर होतं आणि टॉमीला विचारण्याकरतां तो वांकतो. टॉमी हातवारे करून लॅंची अंग खाजवत असल्याचं सांगतो. कर्नल येतो. या घोळक्यानं बुचकळ्यांत पडून उभा रहातो दाराशींच. तेवढ्यांत टॉमी इतरांना खुणावून 'तो क्षण आल्या'चं सुचवतो, किल्ट उतरण्याचा आविर्भाव करतो, तेवढ्यांत कर्नलचे शब्द.)*

**कर्नल** : हें काय चाललंय काय ? *(गोंधळ आवरून भराभर सारे ताठ होतात. टॉमी आणि डिगर आपापल्या कॉटकडे धांवतात. यांक आडोशाजवळ रहातो. किवि यांकजवळ उभा. आणि किविमागें ब्लॉसम.)*

**टॉमी** : *(धडपडत जागीं येऊन)* एका पैजेचा निर्णय ठरवत होतों आम्ही, सर. किल्ट—किल्ट, सर. किल्ट. *(अटेन्शनमध्यें उभा.)*

**कर्नल** : ऑर्डर्ली कुठं आहे ? सिस्टर कुठं आहे ?

**यांक** : कांहीं—कळत नाहीं—आतांच बाहेर गेल्या त्या, सर—

**कर्नल** : हूं. आणि सार्जंट मॅक्लॅचलेन कुठं आहे ?

**किवि** : *(आडोसे दर्शवीत)* तिथं, सर.

**कर्नल** : *(यांकला)* आडोसे दूर करा. मला त्याच्याशीं बोलायचंय.

**यांक** : येस, सर. *(उजवा आडोसा किविच्या कॉटकडे सरकवतो. किवि डावा आडोसा असाच बाजूला सरकवतो. लॅंची दिसतो. वळून या मंडळीकडे*

*पाहूं लागतो. त्याच्या अंगावर आतां इस्पितळाचे कपडे.)* लॅंची, कर्नल भेटायला आले आहेत.

**लॅंची :** *(भराभरा बटनं लावीत)* कपडे बदलत होतों, सर.

**कर्नल :** ठीक ठीक. *(त्याच्याजवळ जात)* मीं पाठवलेल्या गोळ्या सुरू केल्यात ?

**लॅंची :** हो. एक घेतली. पण आतां आणखी मात्र घेणार नाहीं.

**कर्नल :** काय म्हणालांत ?

**लॅंची :** तुम्हांला मला हें सांगायचं जिवावर येतं सर, पण ब्रिटिश सोल्जर म्हणून त्या गोळ्या नाकारण्याचा हक्क मला आहे.

**कर्नल :** *(इतरांकडे पहात)* तुम्ही जरा बाहेर जा. *(ते लगबगीनें जातात. सर्वांत शेवटी यांक. तो बाहेर जातांना दार ओढून घेतो. कर्नल आतां लॅंचीला)* डी. एम. एस. शीं तुमच्याबद्दल बोलून इथं आलोंय मी.

**लॅंची :** माझ्यावर कसला 'चार्ज' ठेवणार आहांत तुम्ही ?

**कर्नल :** खालीं बसा. *(लॅंची कॉटवर बसतो.)* तुम्हांला इथं आणण्यापूर्वीं मीं जी. एच. क्यू. कडे, तुम्हांला विमानानं परत पाठवतां येईल कीं काय, याची चौकशी केली होती.

**लॅंची :** परत ? परत म्हणजे कुठें परत ?

**कर्नल :** स्कॉटलंडला. तिथं जावं असं तुमच्याहि मनांत असल्याचा समज होता माझा. तिथल्या कांहीं विशेष कामांकडे लक्ष पुरवण्याची आवश्यकता भासत असेल तुम्हांला. परंतु जी. एच. क्यू. नं माझी सूचना 'अव्यवहार्य' असल्याचं कळवलं. 'असल्या सोयी करायच्या तरी कितीकांच्या ?' असा त्यांचा सवाल. माझ्या माहितीप्रमाणें तेव्हां एकशेंआठ ब्रिगेडिअर्स वेटिंग लिस्टवर होते.

**लॅंची :** *(संशयानें)* माझ्याकरतां तुम्ही हें कां करावं असा प्रश्न मला पडलाय.

**कर्नल :** माझी सूचना फेटाळली गेली, तेव्हां तुम्हांला इथं ठेवण्याचं ठरवलं मीं. *(नाक कुरवाळून)* कसं काय चाललंय तुमचं ? चांगलं चाललंय ? समाधान आहे ना ?

**लॅंची :** हो. इथलीं माणसं चांगलीं आहेत, सर.

**कर्नल :** *(यांकच्या कॉटवर बसत)* तर आत्तांच मला कळवण्यांत आलं आहे कीं जी. एच. क्यूच्या कुणी तरी, वेटिंग लिस्टवरच्या माणसांपेक्षां तुमचं महत्त्व जास्त मानून माझी सूचना मानण्याचं ठरवलं आहे.

**लॅंची :** काय चेष्टा करतां, सर. मी साधा सार्जंट. अर्थात् कॅमेरॉन्समधला.

**कर्नल :** तें कांहीं असलं तरी तुमच्या प्रवासाची व्यवस्था करण्यांत आली आहे इतकं खरं. माझ्याबरोबर तुम्ही विंग कमांडरकडे यायचं, म्हणजे झालं. तीन दिवसांत तुम्ही स्कॉटलंडमध्यें पोंचाल. जायची इच्छा आहे ना तुमची ?

**लॅंची :** मोह फार मोठा आहे. परत कधीं येतां येईल मला ?

**कर्नल :** *(किंचित् कचरतच)* परत येतां यायचं नाहीं.

**लॅंची :** म्हणजे माझ्या रेजिमेंटमध्यें मला पुन्हा दाखल होऊं देण्यांत येणार नाहीं असा याचा अर्थ ?

**कर्नल :** हें पहा सार्जंट—मला एक हुकूम देण्यांत आला आहे. माझा त्याबाबत मतभेद आहे, परंतु मी पडलों सैनिक. अर्धा तास त्याबाबत मीं हुज्जत घातली, युक्तिवाद केला. आतां माझा इलाज नाहीं. कुठं तरी एक कायदा आहे—बोअर वॉरपासूनचा जुना आहे म्हणतात तो—डी. एम. एस. ला तो आठवतो इतकं खरं—मला सांगण्यांत आलं आहे कीं तुमच्या केसबाबतचं खरं तें सर्व कांहीं तुम्हांला मीं सांगितलं पाहिजे.

**लॅंची :** पण खरं तें सर्व मला सांगितलेलंच आहे.

**कर्नल :** किडनीमध्यें शार्पनेल घुसून तुम्हाला इथं आणण्यांत आलं तेव्हां तुम्ही ह्यांतून बरे व्हाल असा संभव होता.

**लॅंची :** मी बराच आहें आतां.

**कर्नल :** ऑपरेशनमधून तुम्ही बरे झालांत हें खरं. पण आतां तुमच्यापाशीं एकच किडनी उरली आहे— आणि ती एकुलती एक किडनी फारशी बऱ्या स्थितींत नाहीं. आतां तुम्हांला फार बरं वाटतं आहे तें आहे माहीत मला, पण तुमची ही एकच एक किडनी कधीं तरी कामांतून जाणार आहे.

**लॅंची :** अस्सं. मग तुम्ही काय करणार ?

**कर्नल :** कांहींच नाहीं. कुणाला आम्ही नवी किडनी तर देऊं शकत नाहीं. या बाबतींत वैद्यकशास्त्र किंवा शस्त्रक्रियेचं शास्त्र कांहीं एक करूं शकत नाहीं. लक्षांत आलं तुमच्या ?

**लॅची** : हो. मग काय होणार माझं ?

**कर्नल** : शेवटाची वाट पहात जगणार तुम्ही.

**लॅची** : किती ? किती दिवस ?

**कर्नल** : आणखी एक, फार तर दोन आठवडे.

**लॅची** : *(क्षणभर गप्प.)* फार थोडा वेळ झाला हा.

**कर्नल** : तुम्हांला आधीं सांगितलं नाहीं मीं हें, कारण त्यांत मला कांहींच फायदा वाटेना. आतां मला सांगण्याची आज्ञा झाली आहे.

**लॅची** : मला वाटत होतं कीं तुमचा डूख आहे माझ्यावर—माझ्याबद्दल अढी आहे तुमच्या मनांत.

**कर्नल** : बिलकुल नाहीं. माझी किडनी तुम्हांला देतां आली असती तर मी आनंदानं दिली असती. दोनांचा काय उपयोग आहे मला तरी. मग ? परत जाणार तुम्ही ?

**लॅची** : डोकं चालत नाहीं माझं. विचार करायला अवधी हवा मला.

**कर्नल** : जी. एच. क्यू. चं असंहि म्हणणं आहे कीं जायचं ठरवलंत तर तुमच्या देशाची आणखी एका प्रकारें सेवा करूं शकतां तुम्ही. ते तुम्हांला 'हीरो' बनवतील. परत जाल तेव्हां 'युद्धांतला वीर' म्हणून वाजत गाजत नेण्यांत येईल तुम्हांला. यांत तुम्हांला स्वारस्य असणार नाहीं हें कळतं मला. पण निदान तुमचा देश तुम्हांला पुन्हा दिसेल. याला पर्याय: इथं रहाणं. तुमच्या मित्रांमध्येंच रहाणं. *('मित्र' शब्दासरशीं लॅचीच्या मनांत कांहीं कडवट संशय खळबळतो. तो संथपणें माथं उचलून बोलतो—आपल्या प्रश्नाचं उत्तर काय असेल या भयानंच प्रश्न उच्चारतो.)*

**लॅची** : *(सावकाश)* सर, इथल्या सगळ्यांना सारं माहीत होतं ? माझ्याबद्दलचं सारं—

**कर्नल** : हो. तुमचा इथला मुक्काम होईल तेवढा आनंदाचा व्हावा अशी इच्छा होती माझी. म्हणून सांगितलं होतं मीं. तुम्हांला मदत करायला, चांगलं वागवायला सर्वांना सांगितलं होतं मीं.

**लॅची** : सिस्टरला ?

**कर्नल** : तिला तर सारं सांगणं भागच होतं.

**लॅंची** : स्कॉटलंडला परत जायचं आहे मला, सर.

**कर्नल** : *(उठत)* सकाळीं तुम्हांला कलकत्त्याला नेऊन सोडण्याची व्यवस्था करतों मी. निर्णय पक्का ठरला ना तुमचा ?

**लॅंची** : *(निश्चयानें, जागचा उठत, खिडकीबाटे पहात)* ठरला.

**कर्नल** : *(उठत)* दरम्यान—?

**लॅंची** : आहे असंच असूं दे मला.

**कर्नल** : ठीक, ठीक. *(पाठमोऱ्या लॅंचीच्या दिशेनें पाऊलभर सरकून)* या वेळीं कांहीं तरी धीर देणारं, दिलासा देणारं, समजावणीचं बोलता यायला हवं होतं मला—

**लॅंची** : *(एकदम वळून कर्नलला सामोरा येत)* राखून ठेवा तें. फार दया अनुभवली मीं, आतां पुरे !

**कर्नल** : माझ्या हातून होण्यासारखं कांहीं असलं तर मला कळवा. *(वळतो.)* तुमच्या कागदपत्रांची व्यवस्था आणि प्रवासाची सर्व तयारी करतों मी. *(जातो निघून. लॅंची आडोशाचे दोन्ही पडदे आपल्या कॉटशीं सरकवत आणूं लागतो. डिगर, टॉमी, किवि आणि यांक परत येतात.)*

**डिगर** : काय म्हणत होता कावबेब्ज, लॅंची ? *(लॅंचीच्या कॉटवर स्थानापन्न.)*

**टॉमी** : गोळ्यांबद्दल दरसा विलान असेल. *(स्वतःची कॉट आणि यांकची कॉट यांच्या दरम्यान येतो.)*

**किवि** : पण आमचा लॅंची तसा लेच्यापेच्या नाहीं. तो पुरून उरला म्हाताऱ्याला. *(खिडकीकडे जाऊन उभा रहातो.)*

**यांक** : *(आपल्या कॉटकडे येतो. कॅमेरा उचलून फिल्म काढून घेत)* त्या म्हाताऱ्याकडे लक्ष देऊं नको, लॅंची. उगींच लेकाचा दमदाटी करीत भाव खात फिरतो. *(ब्लॉसम येतो. डिगरच्या कॉटपलिकडेच थबकतो. यांक कॉटवर बसतो. हातांत फिल्मचा रोल.)* डेव्हलप करायला नेतों हा. *(लॅंची तीरासारखा पुढें होऊन फिल्म हिसकावतो. उलगडून जमिनीवर भिरकावतो.)*

**डिगर** : *(उठत)* अर्रे—काय केलंस रे हें ?

**यांक** : अरे वाया गेली ना ती !

**लॅंची** : तुमच्या जागेवर जाल का तुम्ही सारे ?

**यांक** : काय झालं, लॅंची ?

**लॅंची** : कुणाशीं बोलण्याची इच्छा नाहीं माझी.

*(आडोशांआड जातो. ते एकमेकांना टेकवन घेतो. बाकीचे एकमेकांकडे टकटका पहाताहेत. मार्गेरेट येते.)*

**मार्गेरेट** : तुम्ही बोललांत त्यांच्याशीं ?

**यांक** : *(तिच्याकडे जात)* सगळे फोटो बिघडवले त्यानं. त्याला काय झालंय काय, सिस्टर ?

**मार्गेरेट** : कर्नलनीं त्याला सारं सांगितलं.

**यांक** : कां ?

**मार्गेरेट** : डी. एम्. एस. चा हुकूम. *(लॅंचीच्या आडोशांकडे जात.)* मला तरी तो साफ चुकीचा वाटला.

**डिगर** : काय फायदा झाला सारं सांगून ? *(टॉमीच्या कॉटवर बसतो. लॅंची आडोशांआडून पुढं येतो. किल्ट आणि इतर वस्तु असलेलं खोकं हातांत. तें सर्व तो यांकच्या कॉटवर ठेवतो.)*

**लॅंची** : हें सर्व परत. *(डिगर जागचा उठतो.)*

**मार्गेरेट** : *(लॅंचीकडे जात)* लॅंची !

**लॅंची** : *(तिच्याकडे वळतो. डोळ्यांत धग)* उद्यां सकाळीं जातोय मी. तुमच्यांत कांहीं सभ्यपणा असेल तर कुणी माझ्याशीं बोलूं नका. माझ्या आडोशांआड मला एकटा राहूं द्या. कुणीही डोळ्यांसमोर नको आहे मला—तुमच्यापैकीं कुणीहि ! *(इतरांवर नजर.)*

**यांक** : *(हात पुढें करून त्याच्याकडे जात)* एक मिनिट ऐक तर, लॅंची.

**लॅंची** : हात लावशील तर तोंड फोडीन !

**मार्गेरेट** : असं करूं नको लॅंची, असं करूं नको.

**लॅंची** : *(तिला)* कुणाचीच गरज नाहीं मला. *(इतरांना)* जसे इतर तसे तुम्ही. मला आधींच कळायला हवं होतं हें. एका किल्टच्या भुक्कड बदल्यांत माझी दोस्ती विकत घेतलीत तुम्ही ! *(आडोशांकडे जातो.)* माझी जास्त किंमत ठेवायला हवी होती मीं. माझ्यावर दया दाखवतांना आणि उपकार करतांना मोठं कृतकृत्य वाटलं असेल सर्वांना. *(आडोशांआड पाऊल ठेवतो. हातानं त्यांत फट पाडलेली.)*

पण आतां संपलं तें. पुन्हा मला आणखी जखमा करूं शकणार नाहीं तुम्ही कुणीच. *(स्वतःला आडोशांआड बंद करून घेतो. सारे निःशब्द आणि सुन्न होऊन पहाताहेत.)*

## प ड दा

## प्र वे श दु स रा

*[तोच देखावा. दुसऱ्या दिवसाची सकाळ. पडदा उघडतो तेव्हां : आडोसे दूर ठेवलेले. लॅची त्याचं बोचकं भरतो आहे. त्याचा बॅग-पाइपहि बांधल्या स्थितींत बाजूला आहे. कॉटवर आपले इस्पितळांतले कपडे त्यानं नेटक्या घड्या करून ठेवून दिले आहेत.*

*इतर सगळे गप्प आणि उदास बसलेले आपापल्या कॉटवर. मार्गरेट ऑफिसांतून येते.]*

**मार्गरेट** : *(कॅमेरा घेऊन बसलेल्या यांककडे जात)* यांक, तुमच्या कागदावर ओ. सी. ची सही मिळाली. *(तो त्याला देते.)*

**यांक** : कधीं निघतां येईल मला ?

**मार्गरेट** : आज दुपारच्या आंत तरी नाहीं.

**यांक** : *(लॅचीच्या कॉटकडे निर्देश करून)* तो कधीं निघणार ?

**मार्गरेट** : कांहीं मिनिटांत. *(जायला निघते.)* ब्रेकफास्टच्या डिशेस गोळा कराल का तुम्ही ? *(ऑफिसांत जाते. यांक हातांतला कागद फडताळावर ठेवून टॉमी, डिगर, ब्लॉसम आणि किविच्या डिशेस आणि वाट्या गोळा करतो.)*

**टॉमी** : *(हें चालू असतांना)* सिस्टरला सर्दी झालीय, नाहीं ?

**यांक** : असं ? मला नाहीं दिसलं. *(डिगरकडे जातो.)*

**डिगर** : म्हाला आज चव नाहीं बुवा. *(डिगरची डिश आणि वाटी घेऊन यांक ब्लॉसमकडे आणि तिथून किविकडे जातो.)*

**किवि** : तूं गेल्यावर बहुतेक हें काम माझ्याकडे येणार.



लोभ नसावा, हे विनंति !

**यांक** : घे कीं. कर. *(लँचीकडे त्याची डिश घ्यायला जातो. लँची इकडे पहात नाहीं. ब्लॉसम स्वतःच्या कॉटवर आडवा होऊन झोंपी जातो.)* तुमची डिश न्यायची आहे. *(लँची बोचक्यांत टॉवेल खुपसतो.)* ब्रेकफास्ट थंड झाला तुमचा. *(लँचीकडून उत्तर नाहीं.)* नकोय तो तुम्हांला ? *(लँची तरीहि उत्तर देत नाहीं हें पाहून यांक त्याची डिश आणि वाटी उचलतो. डिशमध्यें अन्न तसंच आहे. हातांतल्या डिशेस आणि वाट्यांच्या ढिगावर ही डिश रचतो.)* सिस्टर म्हणते, कांहीं मिनिटांत इथून जाणार तुम्ही.

**लँची** : हं.

**यांक** : मदत करूं का ?

**लँची** : नको.

**यांक** : मीहि आज दुपारीं जाणार. *(आवेगानें)* पण तूं रहातास लँची, तर पंधरवडाभर इथंच राहिलों असतों मीहि तुझ्याबरोबर. अर्थात् तुझी इच्छा असती तरच. *(उत्तर नाही.)* जातो आहेस याचं अति वाईट वाटतंय मला. *(तरीहि उत्तर नाही.)* सारं बरं व्हावं यानंतर, एवढीच इच्छा. *(हात पुढें धरून)* आतांच निरोप घेऊं या. *(उभा.)*

**लँची** : ठीक. *(यांक वळतो. डिशेस, वाट्या नेत असतां मार्गरेट भेटते. सगळ्यांत वरच्या डिशमध्यें अन्न शिल्लक उरलेलं तिला दिसतं. यांक तसाच पुढें भटारखान्याकडे तें सर्व घेऊन जातो. जातांना दार उघडंच टाकतो. मार्गरेट लँचीकडे येते. त्याच्या कॉटच्या पायथ्याशीं थांबते.)*

**मार्गरेट** : हे तुमचे पेपर्स. *(तो ते घेत नाहीं तेव्हां ती ते कॉटवर ठेवते.)* निघण्याची तयारी झाली कीं बोलवायला पाठवतील ते.

**लँची** : *(तिच्याकडे न पहातां)* झालीच माझी तयारी.

**यांक** : *(परत येतो.)* मदतीला या कोणी. *(जातो.)*

**किवि** : *(उठून टॉमीला)* चल रे. मदतीला चल. *(जातो.)*

**टॉमी** : *(उठून डिगरला)* हं, चल मदतीला. *(जातो. डिगरहि जातो. जातांना दार ओढून घेतो.)*

**मार्गरेट** : मी इथंच थांबून जरा बोलूं का तुमच्याशीं ?

**लँची** : काय बोलायचं ?

**मार्गारेट** : *(यांच्या कॉटवर बसते.)* तरी पण ऐका—पुन्हा नाहीं बोलायची संधि मिळणार.

**लॅंची** : बोलण्यासारखं कांहीं उरलं नाहीं.

**मार्गारेट** : तुम्हांला कर्मीत कमी दुःख व्हावं, अशी इच्छा होती आम्हां सर्वांची. यांत कांहीं गैर झालं का ?

**लॅंची** : सैनिक होतों मी. मरणहि तसं नवं नव्हतं मला. याचा विसर पडला तुम्हांला.

**मार्गारेट** : आमचा द्वेष मनांत वागवून इथून जाऊं द्यायची नाहीं मी तुम्हांला.

**लॅंची** : *(बोचकं बांधून कॉटवर ठेवतो.)* मला कुणी अडवूं शकणार नाहीं.

**मार्गारेट** : केवळ आम्हांला सारं सुरुवातीपासून माहीत होतं एवढ्यासाठीं आमच्या तुमच्याविषयींच्या भावना खोट्या, अप्रामाणिक होत्या असं म्हणाल तुम्ही ?

**लॅंची** : या प्रश्नाचं खरं उत्तर द्यायची तुमची छाती आहे ? *(प्रथमच तिच्याकडे पहातो. डोळ्यांत चीड. आणि व्यथा.)*

**मार्गारेट** : आम्हांला कळत होतं म्हणून आम्हीं जास्त समजूत दाखवली हें अगदीं खरं. पण नाहीं तर काय आम्ही बेफिकीरपणें, बेकदरपणें वागायला हवं होतं ?

**लॅंची** : प्रामाणिक असतांत तर तसेंच वागलां असतात. जगभर तुमच्या जातीची निपज मुबलक आहे. एकाद्याला चेंचणारी, बुचाडणारी, त्याचा पिच्छा पुरवणारी, त्याला माणसांतून उठवणारी, त्याचा घात करणारी जात तुमची. तो मरणार हें आधीं माहीत नसेल तर यांतच तुम्हांला सुख. हाच तुमच्या लेखीं न्याय. ही रीत. आणि मग घाबराल. अपराधाचा सल तुम्हांला कासावीस करूं लागला कीं नाइलाजानं होतां चांगले. हें तुमचं गरजेपोटचं चांगुलपण एकाद्या पशूलाहि साजणार नाहीं. माझ्यासाठीं केलंत त्याबद्दल बिलकुल आभारी नाहीं मी तुमचा ! *(कॉटच्या पायथ्याकडे येऊन जवळ जवळ 'अटेन्शन' मध्यें उभा रहातो.)*

**मार्गारेट** : कशा का पद्तीनें झालेलों असेनात, पण आम्ही तुमचे मित्र आहोंत हें खरं. जगांत फक्त एवढेच सगे सांगाती लाभले आहेत तुम्हांला. आमची उपेक्षा नका करूं. रहा इथें.

**लॅची** : तुम्हां लोकांच्या वागण्यानं कांहीं काळ वाटलं कीं भोंवतालच्या माणसांची किंमत चुकीची केली मीं; चुकीचीं मतं, चुकीचे ग्रह बनवले. मरायच्या वेळीं घोर फसवणूक करूं पाहिलीत तुम्ही माझी! याचा किती त्रास झाला, होतो आहे त्याची काय कल्पना तुम्हांला!

**मार्गरेट** : तुम्हांला असंच वाटतं कीं तुमच्याशीं आम्ही चांगले वागलों ते केवळ सारं आधीं माहीत असल्यानेंच वागलों?

**लॅची** : सारं माहीत असल्यानें तुम्ही असे अधिक वागलांत—असे वागत राहिलांत, हें नाकारतां तुम्ही?

**मार्गरेट** : नाहीं. मला तें नाकारता येत नाहीं.

**लॅची** : *(टॉमी आणि यांकच्या कॉटच्या दरम्यान.)* माझ्याशीं चांगलं वागणं काय सोपं गेलं तुम्हांला?

**मार्गरेट** : नाहीं.

**लॅची** : *(जवळ जवळ ओरडून)* आतां सांगा, मी मरणार म्हणून माझ्यावर लोभ केलात तुम्ही याचा अभिमान बाळगूं मी? त्यांत आनंद मानूं?

**मार्गरेट** : तेवढंच कारण त्याला असतं तर—नाहीं.

**लॅची** : मी म्हणे, मी एक पुस्तक लिहीन. मी ईश्वराच्या शिकवणुकीचा प्रसार करीन. माझ्या बांधवांना माझं घर देईन, माझी जमीन देईन. मनांतल्या मनांत खदखदां हंसलां असाल सारे! *(खिडकीकडे जातो.)*

**मार्गरेट** : *(उठते.)*माझं जरा ऐकून घ्या. सारं विसरा; पण एक लक्षांत ठेवा: थोडाच काळ का होईना, इथं मैत्रीचा खरा अर्थ अनुभवायला मिळाला तुम्हांला. आपल्याला अलिकडे स्वर्गांत असल्यासारखं वाटतं असं तुम्हीच ना म्हणालां होतात?

**लॅची** : बरोबरीच्या माणसांवर प्रेम करायला शिकण्यासाठीं मरावं लागणार असेल मला, तर कुणावर प्रेम न करतां आणि कुणाच्या प्रेमाची अपेक्षा न ठेवतांच मरेन मी. प्रेमाची फार जबर किंमत पडते आहे मला. *(कॉटकडे येतो.)*

**मार्गरेट** : मी म्हणतें, लोक चांगले कां वागतात त्याचीं कारणं कशाला हवींत कुणाला?

**लॅची** : तयारी झाली माझी.

**मार्गरेट :** *(त्याच्या अगदीं जवळ जाऊन)* निरोपाच्या या वेळीं—तुमचं—चुंबन घेतलं मीं, तर राग येईल तुम्हांला? लग्नाची मागणी घातली होतीत तुम्हीं मला—

**लॅची :** पुरे. इतःपर तो विषय नको.

**मार्गरेट :** *(त्याच्या मागोमाग किविच्या कॉटशीं येत.)* मी तुमच्याशीं लग्न करतें म्हणालें तेंहि तुमच्याविषयींच्या दयेपायीं, असं वाटतं तुम्हांला?

**लॅची :** *(न वळतां)* दया नव्हती तुमच्या मनांत?

**मार्गरेट :** ओठंगलं होतं हृदय दयेनं—स्त्रीच्या हृदयांत ती नेहमींच उमाप असते.

**लॅची :** तुमच्यासाठीं शब्द नाहींत माझ्याकडे.

**मार्गरेट :** *(दीर्घ स्तब्धतेनंतर)* तुमचं सामान न्यायला यांक मदत करील तुम्हांला. *(वॉशरूमकडे जायचं दार उघडून हाक मारते.)* यांक! *(लॅचीकडे येत.)* आत्तां, तुम्ही निघण्याच्या आंत तुमच्याशीं लग्न केलं मीं, तर बदलेल तुमचं मन?

**लॅची :** नाहीं. *(यांक येतो. मागून डिगर. ब्लॉसम झोंपलेला उठून बसतो.)*

**मार्गरेट :** *(आंत जात)* यांक, यांना निघण्याचा निरोप आला कीं सामान न्यायला मदत करा. *(जाते. यांक लॅचीच्या सामानाकडे जातो.)*

**लॅची :** *(कॉटकडे जात)* मला नको आहे मदत! *(यांक आपल्या कॉटवर बसून कॅमेऱ्यांत दुसरा रोल भरूं लागतो. लॅची स्वतःच्या कॉटवर बसलेला. ब्लॉसम बसून लॅचीच्या बोचक्याकडे पहातो आहे. लॅची जाणार असल्याचं त्याला कळलं आहे.)*

**यांक :** साला हा रोल बसतच नाहीं कॅमेऱ्यांत.

**डिगर :** *(स्वतःच्या आणि टॉमीच्या कॉटच्या दरम्यान येत)* आतां काय उपयोग त्याचा, म्हणा. *(टॉमी आणि किवि येतात. टॉमी त्याच्या कॉटकडे जातो. किवि डिगरपाशीं थबकतो.)*

**यांक :** मनांत होतं कीं जाण्यापूर्वी माझ्याकरतां सगळ्यांचे फोटो काढून घ्यावेत.

**डिगर :** माझा नको. कसलाच उत्साह नाहीं आतां आपल्याला. *(ब्लॉसम लॅचीकडे जातो. गळ्यांतली मण्यांची माळ काढून लॅचीपुढें धरतो.)*

**ब्लॉसम :** ब्लॉस्—सम. *(लॅची दुर्लक्ष करतो. ब्लॉसम ताटकळतो तसाच. पुन्हा माळ पुढें करतो.)* बक्...शीश. *(स्तब्धता. लॅचीचा उजवा हात धरून त्यांत ती माळ ठेवतो. लॅची उठतो, माळ ब्लॉसमच्या अंगावर जोरानें फेकतो. ब्लॉसम व्यथित झालेला, चकितहि झालेला. तो मागें हटतो.)*

**लॅची :** *(ओरडून)* चालता हो इथून! *(सगळे उठतात. यांक झटक्यानें पुढें होऊन लॅचीला खस्सदिशीं पकडून सामोरा धरतो.)*

**यांक :** *(चवताळलेला)* जाण्यापूर्वी कांहीं ऐकावायचं आहे तुला. ऐक. मुळांतच कीड लागली आहे बेट्या तुझ्या मनाला आणि त्यावर उपाय बंदुकीची गोळी. साऱ्या आयुष्यभर तुला कष्ट, अपेक्षाभंग, अपमान, उपवास काढावे लागले, सुखासुखी कांहीं मिळालं नाहीं, आणि चिडलास तूं—चडफडलास. त्याचा सूड भेटणाऱ्या प्रत्येक माणसावर उगवीत राहिलास. तुला नको आहे आमची मैत्री? ठीकच आहे—तिच्या बदल्यांत कांहीं दिलेलं नाहींस तूं, ती मिळवायला कांहीं पडलं नाहीं तुला. फुकट मिळाली ती, कांहीं न करतां, आयती मिळाली. मग आतां लाथा झाडतोस त्या कशासाठीं? आणखी ऐक...तूं कधीं मरणार तें तुला आगाऊ कळलं नाहीं म्हणून भडकलास, चवताळलास तूं, पण आणखी कुणाला कधीं त्याचं मरण आगाऊ समजलं आहे? नाहीं. पण तुला तें कळायला हवं होतं! खात्रीच्याच गोष्टीवर पैज मारणाऱ्यांपैकीं 'वीर' तूं! नामर्द माणसा, धाडस नाहीं तुझ्यांत! जिगर नाहीं! पुरुषार्थ नाहीं! जन्मल्यापासून जगायला भीत आला आहेस तूं. आयुष्य म्हणजे काय वाटलं तुला, सर्टिफाइड चेक?

**लॅची :** तुम्ही फसवलंत, गोत्यांत पाडलंत मला! तुमच्या मैत्रीवर विसंबलों मी, पण तुम्ही मैत्री नाहीं दिलीत मला, दया दिलीत! भीक घातलीत!

**यांक :** या ब्लॉसमला काय तुझ्याबद्दल दया वाटली? *(स्तब्धता.)* त्याला तर तूं मरणार हें कधीं कळलं नाहीं! त्याला तूं आवडला होतास. तुला कांहीं द्यावं असं मनापासून, उमाळ्यानं वाटलं त्या भाबड्या जीवाला. आणि तूं—तूं काय केलंस? त्याची दोस्ती त्याच्या अंगावर भिरकावलीस तूं! ऐक! तूं मरणार हें फार उत्तम होतं आहे. तुझ्या जातीचीं माणसं या जगांत फार दुःखाला कारणीभूत होतात. तुला वांचवणं शक्य असतं तरी तुला वांचवलं नसतं मी, ऐकलंस! इतका तुझा मला तिरस्कार वाटतो आहे! *(ताड्ताड् कॉटकडे जाऊन कॅमेऱ्याशीं झटापट करीत बसतो. लॅची ब्लॉसमकडे वळतो—यांक म्हणाला त्यावर विचार करीत स्वतःच्या कॉटशीं बसतो.)*

**डिगर** : एवढं कठोर बोलायला नको होतंस तूं त्याला, यांक. *(मार्गरेट येते. यांककडे जाते.)*

**मार्गरेट** : कशाबद्दल ओरडत होतां तुम्ही ?

**यांक** : त्या माथेफिरूनं ब्लॉसमचा अपमान केला, त्याला मारलं.

**मार्गरेट** : मारलं ? तें कां ?

**यांक** : हा जातोय हें कळल्यावर जवळची मण्यांची माळ त्याला द्यावी असं ब्लॉसमला वाटलं, म्हणून.

**मार्गरेट** : असूं दे. *(लॅचीकडे येते.)* लॅची, निघायची वेळ झाली आहे. तयारी झाली आहे ना तुमची ? *(तो मूक बसलेला.)* जायची तयारी आहे ना तुमची ?

**लॅची** : हो.

**मार्गरेट** : *(बाहेर जात)* यांक—सामान उचला त्यांचं.

**यांक** : नाहीं उचलणार. त्याला मदत नको आहे कुणाचीच. नेऊं द्या त्याला एकट्यालाच.

**मार्गरेट** : *(थांबते. यांककडे येते.)* त्यांच्याकरतां कांहीं करण्याची ही अखेरची संधि आहे तुम्हांला—

**यांक** : जायची काय जरूर पडल्यय त्याला ? चूक कळते आहे त्याला, पण असा हट्टी कीं ती कबूल करण्यापेक्षां मरेल एकटाच ! मी नाहीं मदत करणार.

**मार्गरेट** : *(डिगरला)* डिगर ? *(तो हलत नाहीं. मग ब्लॉसमकडे जाते.)* ब्लॉसम—

**लॅची** : *(उठत)* मदत नको मला. मी एकटा जाणार. *(बोचकं कॉटवरून भुईवर घेतो. बॅगपाइप उचलतो. आणि बोचकं ओढीत बाहेर जायला निघतो. सावकाश चालतो आहे. माथं झुकलेलं.)*

**मार्गरेट** : लॅक्लॅन ! *(थबकतो. स्तब्धता.)* गुड बाय. *(दाराकडे जातो.)*

**यांक** : *(ताड्दिशीं उठून, पुढून लॅची जातांना भराभर आणि ठणकावून बोलतो)* आतां चालला रे हा, विटाळ गेला, बला टळली, रोग संपला. तेव्हां चला, आपले फोटो घेऊं ! चला रे, किवि, टॉमी, डिगर, ब्लॉसम—*(मार्गरेटच्या हातांत सक्तीनें कॅमेरा खुपसतो.)* सिस्टर, घ्या, काढा आमचे फोटो.

*(सगळ्यांना एकत्र करून)* कम् ऑन—गेट टुगेदर ! *(मधोमध सगळ्यांचा घोळका. दाराशीं गेलेला लॅंची वळून पहातो. घसा खांकरतो.)*

**लॅंची** : तुम्ही माझा अपराध केलात हें कबूल कराल, तर इथं रहाण्याचा विचार करीन मी.

**यांक** : *(त्याला)* आपल्या रहाण्याची भीक नको आहे आम्हांला—जा, वेळ वायां नका दवडूं. चालूं लागा. *(मार्गरेटला)* हं, सिस्टर, काढा ना फोटो.

**लॅंची** : पुन्हा मग राहा म्हटलंत तरी रहाणार नाहीं मी.

**यांक** : *(त्याच्याकडे दुर्लक्ष करून)* आम्ही 'रेडी' आहोंत, सिस्टर. घ्या फोटो लौकर !

**लॅंची** : *(बोचकं खालीं टाकून, डिगरच्या कॉटवर बॅगपाइप ठेवून मार्गरेटकडे धांवतो.)* माझ्या परवानगीशिवाय ती फिल्म वापरतां येणार नाहीं तुम्हांला !

**यांक** : *(त्याला गांठत)* हें पहा—आम्ही कांहींएक मागूं इच्छित नाहीं तुझ्याकडे. आम्हांला तुझी क्षमाहि नको आणि फिल्महि नको.

**लॅंची** : पण तो रोल माझा आहे. त्याचे पैसे मीं दिले आहेत.

**यांक** : *(तगमगून)* परत देतों तुझे पैसे मी !

**लॅंची** : *(उलट किंचाळत)* तो माझा प्रश्न आहे. मला नकोत पैसे परत ! मला फिल्म हवी !

**यांक** : जेनेसिस, एक्सोडस, लेव्हिटिकस—

**किवि** : दमानं घे, यांक—

**मार्गरेट** : लॅंची, आतां तरी पुरे !

**यांक** : *(मार्गरेटकडून कॅमेरा घेतो. तो खोलूं लागतो प्रयत्नपूर्वक.)* जाऊं दे, घेऊं दे त्याला त्याची फिल्म. मरूं दे लेकाच्याला. *(लॅंचीकडे वळतो.)* पण एकाद्याला साऱ्यांच्या तिरस्काराचाच विषय होऊन जगांत एकदेखील मित्र न जोडतां कां मरावंसं वाटतं तें कधीं तरी कळायला हवंय मला !

**लॅंची** : *(यांककडे, मार्गरेटकडे पहातो. त्यांच्या डोळ्यांत त्याला नमण्याचं चिन्ह दिसत नाहीं. इतरांकडे पहातो. स्वतःच्या कॉटवर गळून बसतो. येणारा हुंदका शर्थीनें दाबतो आहे, परंतु अखेर तो फुटतोच.)* मला असं मरायचं नव्हतं.

**मार्गरेट :** *(लॅचीकडे जाते. त्याच्या खांद्यावर हात ठेवते. वांकते.)* लॅचलेन,—तुझ्या मनांत आहे तेंच कां बोलत नाहींस तूं ?

**लॅची :** *(संथपणें उठतो. सर्वांना पाठमोरा उभा राहून बोलूं लागतो.)* सोपं नाहीं तें माझ्यापुरतं तरी. मला मिळत नाहीं, मिळणं शक्य नाहीं त्याचा द्वेष करायला शिकलों मी. त्यामुळेंच माझा स्वाभिमान, माझं मीपण शाबूत राहिलं. पण आतां संपलं. आतां हें मीपण जपायला वेळ नाहीं उरला. मला रहायचंय. इथं रहायचंय. त्यासाठीं भीक मागायची असेल तुमच्याकडे तर भीक मागतोंय मी, याचना करतोंय. राहूं मी ?

**यांक :** अरे, सरळ जाऊन कपडे कां बदलत नाहींस, दोस्त ? वर आणखी विचारतोय !

**मार्गरेट :** माझ्या ऑफिसांत जाऊन कपडे बदला. *(लॅची त्याच्या कॉटकडे जातो. तिथले घडी करून ठेवलेले कपडे घेऊन मार्गरेटच्या ऑफिसकडे जातो. तो जाईपर्यंत कुणी हलत नाहीं. मग यांक किविच्या कॉटवर बसतो.)*

**यांक :** आई हवी होती या वेळीं. लहान होऊन तिच्या तोंडावर दोन लाथा हाणाव्या असं वाटतंय. *(किवि यांकच्या कॉटवर बसतो. टॉमी खिडकीकडे जातो.)*

**डिगर :** *(डिगरच्या कॉटवरच्या लॅचीच्या बॅगपाइपकडे निर्देश करून)* मी म्हणतों त्याला हा आपण वाजवूं दिला तर जास्त बरं वाटेल, नाहीं का त्याला ?

**टॉमी :** मला नाहीं वाटत त्याला वाजवतां येईल तो आतां. छातींत दम उरलाय कुठें त्याच्या आतां ? *(डिगरच्या कॉटच्या एका बाजूला बसतो.)*

**डिगर :** जरा पांढुरकाच वाटला चेहरा त्याचा.

**किवि :** सिस्टर, मला वाटतं तुम्ही आंत जाऊन जरा पहा त्याला.

**मार्गरेट :** नाहीं. नको. त्याचं मीपण गिळलं आहे त्यानं. तें पचवायला जरा वेळ लागेल त्याला.

**यांक :** *(उठतो.)* आपण फोटो काढणं कां उरकीत नाहीं तोंपर्यंत ?

**मार्गरेट :** हां, ही चांगली आहे कल्पना. चला उरकून टाकूं—

**यांक :** *(कॅमेरा तिच्या हातीं देत)* उरकून टाका—आम्हांला लांब पांढऱ्या दाढ्या फुटायच्या आंत ! *(सारे आपापल्या जागा धरतात. किवि, ब्लॉसम,*

*यांक, डिगर, टॉमी. मार्गरेट ब्लॉसमची मण्यांची माळ घेऊन लॅचीच्या कॉटवर टाकते.)*

**मार्गरेट** : *(कॅमेऱ्यांत पहात)* जवळ जवळ या सगळे.

**टॉमी** : सिस्टर, आम्ही फार सुरेख दिसतों का हो ?

**मार्गरेट** : *('फाइंडर' मध्यें पहात)* तुम्ही दिसत नाहीं मला. *(मग डोळे किलकिले करून त्याच्याकडे पहाते.)* सुरेख कांहीं नाहींत, पण फार प्रेक्षणीय मात्र दिसतां. *(पुन्हा कॅमेऱ्यांत पहाते.)*

**किवि** : आतां टाका बरं काय दिसतंय तेंच झडपून. पाय दुखले माझे.

**मार्गरेट** : वन—टू—*(ती तीन म्हणण्याच्या आंत लॅची आंतून बाहेर येतो. त्यानं त्याचं 'किल्ट' पेहेनलं आहे. सर्वांकडे तो अस्वस्थपणें पहात रहातो. तो बोलेल म्हणून ते वाट पहातात.)*

**लॅची** : कुणाची हरकत नसेल तर, मी राहूं का फोटोंत उभा ? *(कुणी बोलत नाहीं.)* फिल्म माझी आहे. *(सूर उतरवून घाईनें)* म्हणजे तें कांहीं मोठंसं महत्त्वाचं आहे असं नव्हे—

**यांक** : *(शेजारची जागा दर्शवीत)* हें इथं आपलं स्थान. हं, या.

*(लॅची साइड-कॅप डोक्यावर ठेवतो. कॉटवरची माळ त्याला दिसते ती उचलतो. ब्लॉसमची मुद्रा यासरशीं उजळते. लॅची घोळक्याकडे येऊन यांकनं दाखवलेली मधोमधची आपली जागा घेतो.)*

**मार्गरेट** : रेडी...*(ती कॅमेऱ्यांत पहात असतां यांक आपला बाहु लॅचीभोंवती वेढतो. लॅची हें पाहून यांककडे मान वळवतो. बाकी कुणी हंसत नाहीं, पण हळूच आाण अगदीं सहज लॅची हंसूं लागतो. आयुष्यांत प्रथमच तो हें अकृत्रिम, अस्सल हंसूं हंसत असावा. यांक त्याच्याकडे पाहून हंसून प्रत्युत्तर करतो. मग लॅची कॅमेऱ्याकडे पाहूं लागतो. तृप्तीचा एक उसासा टाकून 'पोज' घेतो.)* वन—टू—थ्री ! दॅटस् इट ! *(टॉमीचं डोकं एकाएकीं दिसेनासं होतं. तो खालीं वाकला आहे. यांककडे पाहून लॅची पुन्हा हास्य करतो आणि एकदम मोठी उडी मारून दोन्ही हातांनीं ? ल्टचा मागला भाग खालीं ताणून धरतो.)*

**लॅची :** धांवा! कोण तें चावटपणा करतंय? *(वळून टॉमीला सामोरा होतो. इतरजण पांगतात. टॉमी कॉटवर वांकलेला दिसतो.)*

**टॉमी :** *(मोठमोठ्यांदा खिदळत)* मला सांपडलं! मीं पाहिलं! मला समजलं

**प ड दा**

